# संगीत महानंदा

( गद्यपद्यात्मक पौराणिक नाटक )

अंक १ ते ३

लेखक :

कै. वासुदेव नीलकंठ आगटे

बलवन्त पुस्तक-भाण्डार,

गिरगांव नाका, मुंबई नं. ४.



बलवन्त प्रकाशन

गिरगांव मुंबई

क्रमांक ३१

तृतीयावृत्ति

ऑक्टोबर, १९५२

किंमत १॥- रुपया

प्रकाशक :
**त्रिंबक विष्णु परचुरे,**
बलवन्त पुस्तक-भाण्डार,
गिरगांव नाका, मुंबई नं. ४.





C/o सातारा स्टेशनरी मार्ट,
सातारा.

**रमाबाई वासुदेव आगटे**



मुद्रक :
**श्रीपाद रघुनाथ राजगुरु,**
राजगुरु प्रेस,
४०५ नारायण, पुणें २.

# पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना

'**महानंदा**' नाटकाचें संविधानक, ग्रंथकारानें स्कंद-पुराणाच्या आधारें लिहिलेल्या श्रीधर कविकृत शिवलीलामृतांतून आधारास घेतलें आहे. 'महानंदे' च्या चारित्र्यावर नाटक रचणारास, दोन-तीन अडचणींशीं झगडणें जरूर होतें. त्या अडचणी अशा — महानंदेच्या चारित्र्यांत स्वाभाविक गुंतागुंत व विविधता नाहीं. महानंदेची गोष्ट सरळ व संक्षिप्त आहे. यामुळें रा. **आगटे** यांस या गोष्टींत आपल्या पदरचीं काल्पनिक किंवा पौराणिक पात्रें गोंवून देऊन कथानकांत गुंतागुंत व विचित्रता उत्पन्न करून घ्यावी लागली. दुसरी अडचण अशी कीं, महानंदेचें नांव श्रोतृमंडळाच्या तितकेंसें परिचयाचें नाहीं; यामुळें पौराणिक किंवा ऐतिहासिक व्यक्ति नाटकाचा नायक किंवा नायिका करण्यापासून मिळणारा फायदा नाटककारास विशेष मिळाला नाहीं. 'महानंदा' नाटकाच्या कर्त्यास येणारी तिसरी मोठी अडचण म्हणजे महानंदा ही कोणी तपोवनांत वैखानस व्रत आचरून राहणारी 'परोक्षमन्मथा मृगशावैः सममेधिता' अशी मुनिकन्या किंवा राजकुमारी नाहीं. ती वारवनिता ऊर्फ वेश्या आहे. 'वेश्या स्मशान-घटिका इव वर्जनीया' अशी सर्वत्र समजूत आहे. तिच्याभोंवतीं अनीतीचें व दुराचरणाचें वातावरण पसरलेलें असतें. सभोंवतीं वणवा पेटलेला असतांना त्याच्यामध्यें जशी एखादी कोंवळी लतिका रुजावी व जोमानें वाढावी तशी महानंदा आहे. अशा वेश्याकुलोत्पन्न मुलीच्या हातून कांहीं पाप होऊं न देतां तिच्या पातिव्रत्याला साजेल असा स्वभावपरिपोष करून दाखविणें हें चातुर्याचें व कसबाचें काम आहे. गणिकेला नायिका बनविणें हा सुद्धां चिकित्सक टीकाकारांच्या दृष्टीनें नाट्यशास्त्राविरुद्ध मोठाच गुन्हा झाला असता; परंतु शूद्रकानें वसंतसेनेला नायिका बनवून नाट्यशास्त्राविरुद्ध वागण्याचें धाडस पूर्वींच करून ठेवलें असल्यामुळें रा. **आगटे** यांच्यावर ठपका आलाच तर तो वांटून घ्यावयास त्यास शूद्रकासारखा महाकवि जोडीदार आहे, ही आनंदाची गोष्ट होय.

संविधानकाची अल्पता, नायिकेची अप्रसिद्धता व वेश्याकुळांत झालेला तिचा जन्म या मोठ्या अडचणी वाटेंत असतां त्यांतूनच मार्ग काढून रा. **आगटे**

यांनीं आपलें नाटक आरंभापासून अखेरपर्यंत. मनोरंजक, सद्‌भावनापोषक व सर्वतोपरी बोधप्रद करून सोडलें आहे. या त्यांच्या कौशल्याबद्दल त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करणें जरूर आहे.

मला लिहिण्यास आनंद वाटतो कीं, 'महानंदा' नाटकांत आरंभापासून अखेरपर्यंत मनोरंजक प्रकार भरपूर आले असतांही, सद्‌भिरुचीला धक्का येईल असा पाचकळ विनोद त्यांत कोठेंही नाहीं. वेश्येच्या घरांतील प्रकार रंगभूमीवर दाखवितांना प्रेक्षकांच्या मुरकुंड्या वळतील व त्यांस पोट धरधरून हंसावें लागेल, असे प्रसंग नाटककारास नाटकांत सहज गोंवतां आले असते; परंतु नाटककार श्री. आगटे या मोहास बळी पडलेले नाहींत. गणिकेच्या घरांतील सर्व प्रसंग त्यांनीं मनःसंयमपूर्वक जरूर तितकेच चित्रित केले आहेत व कोठेंही सदाचाराची मर्यादा उल्लंघन केलेली नाहीं. नाटकांतील मुख्य विनोदी पात्रें नारद व तुंबरू हीं होत. या पात्रांचा विनोद निष्पाप व बोधप्रद असा झाला आहे....नाटक संपल्यावर प्रेक्षक कोणत्याही प्रकारच्या पापवृत्तीचा अंकुर मनांत न उद्‌भवतां, उल्हसित होत्साता घरीं परत गेला म्हणजे नाट्यप्रयोग मनोरंजक झाला म्हणून समजावें. 'महानंदा' नाटक या कसोटीस पूर्णपणें उतरतें असें मला वाटतें.

'महानंदा' नाटकाचें मनोहरत्व वाढविण्यास आणखी एक गोष्ट मुख्यत्वें-करून कारणीभूत झाली आहे. ती ही कीं, नाटकाची भाषा सरळ, सुबोध, भारदस्त व चटकदार आहे. अलीकडे फारशी व उर्दू पद्धतीवर नाटकांतील पदें करण्याची चाल प्रचलित होऊं पहात आहे. मानापमानांतील पदें लोकप्रिय होण्यास त्यांच्या चटकदार चालीच विशेष कारण झाल्या आहेत; परंतु या चालींत पदें करावयाचीं झाल्यास तीं सरळ व सुरूप भाषेंत बसविणें फार कठीण असावें, अशी मानापमान, विद्याहरण व रा. कोल्हटकर यांचीं नाटकें पाहून माझी दृढ समजूत झाली होती. परंतु महानंदा नाटकांतील पद्यरचना पाहून ही माझी समजूत मला बदलावी लागली आहे. या नाटकांतील बहुतेक सर्व चाली नव्या पद्धतीच्या असून पदें अत्यंत सुगम झालीं आहेत. त्यांत क्लिष्टता किंवा ओढाताण बिलकूल आढळत नाहीं. उदाहरणार्थ, ब्रह्मानंदाचें —

**"मी नारि-नरांचें तन-मन-धन झणिं वेधिन या नयनें ॥ चल-बिचल करिन तरुण-तरुणि-मन सारिगम गाउन अभिनय दाउन" इ.**

हें धांवपळीच्या चालींत म्हणावयाचें पद वाचावें, म्हणजे पदाचा अर्थ किती सुलभ साधला आहे, हें स्पष्ट होईल. नारद व तुंबरू वेषांतर करून आल्यावर —

**नटजन वेष खचित गमतीचा ॥ बहुत हिमतीचा अमित किमतीचा ॥ अंतर्बाह्य विरोध कृतीचा, गुप्त शोक परि हास्यरसाचा ॥१॥ बाह्यांगीं नवसुंदर योषा, अंतरिं अश्वनिमा पुरुषाचा ॥**

हें पद रम्यार्थप्रतिपादक व नटाच्या धंद्याची थोरवी वर्णन करणारें व नाट्यप्रसंगास अनुरूप असें साधलें आहे. महानंदेचीं पदें तिच्या प्रेमळ व गंभीर स्वभावाला साजेल अशा प्रकारच्या चालींतच घातलीं आहेत; त्यामुळें रसपरिपोष चांगला होतो. येथें जास्ती पदें उतरून घेऊन त्यांची छाननी करण्यास अवकाश नाहीं. परंतु एक–दोन पदांचा उल्लेख केल्याशिवाय माझ्यानें पुढें जाववत नाहीं. महानंदा स्त्रीदेहविक्रयाविरुद्ध कोटिक्रम करते तेव्हां ती आपल्या वेश्या आईस विचारते,

**" असे कीं स्त्रीचा हा जडदेह तसा ॥**
**नगर चतुष्पथि स्थापन केला मुख पहाण्या आरसा ॥**
**" किती अभागिनी या नायकिणी "**

तसेंच " **गिरिजाधव सांब सदाशिव हा** " इत्यादि पदें फारच चटकदार साधलीं आहेत व तीं नाटक लोकप्रिय करण्यास साधनीभूत झालीं आहेत. नाटकाचें मुख्य अंग जें सात्त्विक मनोरंजन तें ' महानंदे ' त साध्य झालें हें वर सांगितलें. आतां अभिनव कविकृतीचा लोकशिक्षणाचे कामीं किती उपयोग होईल हें पाहून हा प्रस्तावनालेख आटोपतों.

नाटक हें लोकशिक्षणाचें एक साधन आहे, असें म्हणण्यांत येतें, परंतु आपण एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे ती ही कीं, नाटक म्हणजे शाळा किंवा कॉलेज नव्हे, किंवा कीर्तन अथवा पुराण नव्हे. त्यांत येणारें लोकशिक्षण आनुषंगिक व शर्करावगुंठितच असलें पाहिजे. श्रोत्यांची करमणूक करतां करतां कवींनीं त्यांच्या हृदयांतील सद्वासनेस स्पर्श केला, त्यांचा कल सद्वासनावृत्तीकडे व सदर कारणांकडे वळवून दिला, म्हणजे नाट्यकवि आपल्या कर्तव्यांतून पार पडला असें मी समजतों. म्हणून महानंदेच्या मुखानें महाराष्ट्रांतील स्त्रियांस पातिव्रत्याचा सुंदर उपदेश करण्याची संधि ग्रंथकारांनीं फुकट न दवडतां तिचा

पूर्ण उपयोग करून घेतला आहे. याबद्दल श्री. आगटे यांचें करावें तेवढें अभिनंदन थोडेंच आहे. हें नाटक वेश्यांनीं पाहिल्यास त्यांचे डोळे उघडून त्या कुलस्त्रिया होतील व त्या नवीन नवीन मुलींस आपल्या धंद्यांत ओढणार नाहींत. कुलस्त्रियांनीं पाहिल्यास त्या अधिकाधिक सद्गुणी व पातिव्रत्यसंपन्न होतील व तरुण पुरुषांनीं पाहिल्यास ते वेश्यागमनादि पातकांपासून दूर राहातील अशीच या नाटकाची रचना साधली आहे. श्री. वासुदेवराव आगटे हे कांहीं नवशिके नाटककार नव्हेत. त्यांचीं लोकप्रिय नाटकें पूर्वीच मराठींत रंगभूमीवर आलेलीं आहेत. प्रस्तुत नाटकानें त्यांच्या नाट्यकवित्वाच्या कीर्तीत चांगली भर पडली आहे. महानंदा नाटकांत क्षुल्लक दोष अजूनही कांहीं राहिले आहेत, ते ग्रंथकर्त्याच्या लक्षांत असून त्यांची सुधारणा ते करीत आहेत. रा. रा. वासुदेवराव आगटे यांच्यासारख्या उदयोन्मुख कवीच्या हातून नाट्यकलेची व पर्यायानें मातृभूमीची सेवा नव्या नाट्यकृतीच्या रूपानें दीर्घ-काळ घडो, असें चिंतून मी ग्रंथकर्त्याची व वाचकांची रजा घेतों.

नागपूर.<br>ता. २८-८-१९१५

**गोपाळ अनंत ओगले,**<br>संपादक, 'महाराष्ट्र', नागपूर

---

# तिसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना

**'महानंदा'** नाटकाच्या पुस्तकाची पहिली आवृत्ति सन १९१५ सालीं आणि दुसरी आवृत्ति सन १९२२ सालीं प्रसिद्ध झाली. त्यानंतर, तीस वर्षांच्या कालावधीनंतर, ही तिसरी आवृत्ति प्रसिद्ध होत आहे. पहिली आणि दुसरी आवृत्ति निघण्याच्या दरम्यान जीं सात वर्षें गेलीं त्या काळांत हें नाटक लाखों रसिकांनीं पाहिलें होतें आणि आपले नेत्र व कर्ण तृप्त झाले असे उद्गार काढले होते. आठदहा कंपन्या या नाटकाचे प्रयोग करीत आणि एकसमयावच्छेदें-करून अनेक ठिकाणीं या नाटकाची मेजवानी रसिक चाखीत असत. शिवरात्रीच्या दिवशीं तर अखिल महाराष्ट्रभर 'महानंदा' नाटकाचे प्रयोग होत असत.

'महानंदा' नाटकाच्या पहिल्या अगर दुसऱ्या आवृत्तीच्या वेळची रंगभूमीची भरभराट आठवली म्हणजे आज कसें सुन्न वाटतें. ग्रँटरोडच्या प्लेहाउसवर तीन थिएटरांत मराठी नाटकांचे प्रयोग होत असत. आठवड्यांत तीन प्रयोग तर दर एक कंपनी करी. त्याशिवाय आडवारीं सुट्टी असल्यास प्रयोग व्हावयाचे सुट्टी नसली तरी प्रवासी नाटक मंडळी आडवारीं नाटकें करीत असे. नाटकांच्या प्रयोगाच्या वेळीं गिरगांव ग्रँट रोडला गेल्यासारखा दिसावयाचा. नाटक पाहाणें हा एक गंभीर आणि महत्त्वाचा कार्यक्रम असावयाचा. नाटकें करणारे आणि नाटकें पाहाणारे दोन वर्ग मन लावून आपापलीं कामें करीत. एकएका कंपनीचा प्रेक्षकगण असावयाचा, एकएका नाटकाचा चाहातागण असावयाचा, एकएका नटाचा भोक्ता वर्ग असावयाचा. नाटक पहाणारेसुद्धां फुटकळ जाणारे थोडे; टोळक्यांनीं जाणारेच बहुसंख्य. जाग्रणाबद्दल प्रेक्षक कुरकूर करीत नसत. किंबहुना जाग्रण झालें तरच प्रेक्षकांना नाटक पाहिल्यासारखें वाटावयाचें असा तो सात वर्षांचा काल होता.

नाटक सजीव असल्याशिवाय चालत नसे. पात्रें भरपूर असल्याशिवाय 'नाटक' असें वाटत नसे. गाणारें पात्र एखाद-दुसरें असून भागत नसे आणि पदें पांच-सात पुरत नसत. जसें धान्याच्या बाबतींत रेशन नव्हतें तसेंच नाटकांतील संपदेबद्दल रेशन नसे. त्या कालीं लाखों लोकांचें मनरंजन करणारें असें हें 'महानंदा' नाटक आहे. यांत ६८ पदें आहेत आणि नऊ गाणारीं पात्रें आहेत. गतिप्रधान आणि कृतिप्रधान असें हें नाटक आहे. जाग्रण झाल्यानंतर सुद्धां प्रेक्षक हें नाटक पहावयास गेला तर झोंप तर त्याला येत नसेच पण जांभई सुद्धां येत नसे. जे साधे जाहिरातींचे मार्ग असत त्या मार्गांचा अवलंब केला गेला म्हणजे प्रेक्षक आपण होऊन थिएटरांकडे जात असत. नटवर्य, नटभूषण, नटश्रेष्ठ, नटसम्राट, स्वरकिन्नरी, स्वरकलिका वगैरे लोकांच्या मुलाखती वर्तमानपत्रांत प्रसिद्ध कराव्या लागत नसत. नाटक हें दृश्य काव्य आहे याचा पुरावा पुरेपूर प्रमाणांत 'महानंदा' नाटक देत असे.

दुसऱ्या आणि तिसऱ्या आवृत्तीच्या दरम्यान मराठी रंगभूमीची बिकट अवस्था होऊन गेली आणि अक्षरशः स्थित्यंतर झालें. दहा वर्षांपूर्वी तर 'मराठी रंगभूमि मेली' असे शब्द ऐकूं येऊं लागले. १९४३ सालीं जो उत्सव झाला तो जणूं शंभर वर्षें भरल्याची जाणीव देण्याकरतां झाला. नाटकें तंत्रबद्ध झालीं पाहिजेत,

पात्रें अगदीं थोडीं असलीं पाहिजेत, हृदयाला नव्हे तर बुद्धीला व्यायाम देणाऱ्या समस्या नाटकांत पाहिजेत — हीं आणि असलीं तत्त्वें मांडलीं जाऊं लागलीं. धंदेवाल्यांची जागा हौशी नट-नटींनीं घेतली; नाटक मंडळ्यांची जागा साहित्य संघांनीं घेतली. एखाद्या रोग्यावर रुग्णालयांत जाण्याची पाळी आली म्हणजे, वैद्यकीचें शास्त्र शिकणारे विद्यार्थी जशी त्याची चिरफाड करतात तशीच नाटकाची झाली.

कुबड्यांशिवाय मात्र अलीकडचीं हीं तंत्रबद्ध नाटकें चालूच शकत नाहींत आणि या कुबड्या म्हणजे 'महानंदा' नाटकासारखीं जुनीं नाटकें. नाटकांच्या प्रयोगाचा सप्ताह जाहीर करावयाचा, त्यांत पांच जुनीं नाटकें जुन्या नटांकडून करवून घ्यावयाचीं आणि दोन नवीं नाटकें हौशी नटांकडून करवावयाचीं असें हें हल्लींचें नवें तंत्र आहे. पैसे पाहिजेत म्हणजे सौभद्र, मृच्छकटिक, झुंझारराव, मानापमान हीं नाटकें करावयाचीं आणि यांत मिळालेल्या फायद्यांतून दिव्यांना किंवा पतंगांना बक्षिसें द्यावयाचीं. सुभद्रा आणि वसंतसेना यांच्या खांद्यावर वैजयंती आणि कुंती उभ्या रहाणार! बालगंधर्व आणि नाना फाटक यांच्या खांद्यावर हे तंत्रविशारद हौशी नटसम्राट बिरुदावली मिरवणार!

'महानंदा' नाटकांत आधुनिक तंत्र नाहीं, एकसारखी डोळ्यांपुढें नाचत राहाणारी समस्या नाहीं. किंवा वास्तववादाचा अभिनिवेश नाहीं. यांत नाटक मात्र भरपूर आहे. भक्तीची भावना ज्यांच्या मनांत होती त्यांचें मनरंजन करीत असे, केवळ करमणुकीसाठीं आलेल्यांचें मनरंजन करीत असे आणि नाकानें वांगीं सोलण्याकरतां आलेल्या बुद्धिप्रधान प्रेक्षकांनाही आपल्या बुद्धीचा तात्पुरता विसर पाडीत असे — असें सामर्थ्य 'महानंदा' नाटकांत होतें.

तीस वर्षांच्या दीर्घ कालावधीनंतर प्रस्तुत नाटक पुस्तकरूपानें जनतेसमोर आणल्याबद्दल प्रकाशकांचें मी कौतुक करतों व त्यांच्या प्रयत्नांचें यथाचित् स्वागत नाट्यरसिक करतील अशी अपेक्षा बाळगतों.

मुंबई.
२१-९-१९५३

**पु. रा. लेले**

---

श्रीजगदंबप्रसन्न

# संगीत महानंदा



## अंक १ ला



### प्रवेश १ ला

१ पद —( कानडा-त्रिवट, बंधन बांधो बांधोरे )

**जय नटेशा ! स्ववशा जय नटेशा ! योषाधृतशीर्षा गौरीवशा शिरिं निशा-पतिकृतप्रकाशा ॥ धृ० ॥ गणांसहित नाचतसे पुढतीं गजानन छूम् छूम् छनन छननन ॥ १ ॥ अनंत दर कोंदविती गिरिचें दिगंतर भं भं भमम भममम ॥ २ ॥ मृदंग डमरूहि तसें करिती मधु रव तोम् तोम् तनन तननन ॥ ३ ॥**

( नंदिग्रामांतील श्रीशंकराचे देवालयांत वारांगना देवापुढें गात व नाचत आहेत असा प्रवेश उघडतो. )

**रंभा** —पुरे गडे हें, आतां त्या भक्तीणबाई येई तोंपर्यंत कांहीं तरी गोष्टी सांगत बसूं या.

**मेनका** —काय ग ? ही भक्तीण म्हणवते, मग हिला हे आमचे शृंगार न् डामडौल कशाला हवेत ? शंकरासारखं कफल्लक बनावं न् स्मशानांत जाऊन खुशाल शंकर शंकर शिव, शंकर, भोळा शंकर करीत बसावं.

**ऊर्वशी** —माझ्या मनांत याबद्दल तिला एकदां बोलायचं आहे.

**तिलोत्तमा** —आपणच कशाला बोलायला हवं ? बोलविणारा जागा होऊन खेळूं लागला म्हणजे आपोआपच सारं होईल !

**वसंतिका** —असा बोलविणारा कोण ग ?

**मधुमालिका** —आपल्याला भुलविणारा तोच.

**लीलावती**—तरी म्हटलं, ही इतकी शंकराच्या भक्तींत गुंग कां ?

**कलावती**—पण शंकरांनीं तर त्याला जाळला म्हणे !

**भामिनी**—सुंभ जळतं तरी पीळ असतोच. शंकरांनीं मदन जाळला, तरी आपल्या मागचा सुळसुळाट कांहीं कमी झाला आहे का ?

**सौदामिनी**—अग, ही तरुण, रूपवान् व संपत्तिमान् अशी असल्यामुळं तिला तो शिळा, सर्व जगानें उपभोगलेला, मदन नको असेल. नवा, कोरा हिच्या स्वरूपाला साजेल असाच पाहिजे असेल.

**रंभा**—गप्प रहा ग ; त्या पहा, सदानंदा व महानंदा देवपूजा आटोपून इकडेच येत आहेत.

**महानंदा**—सख्यांनो !

**२ पद**—( पूरिया-त्रिवट-सा नीधनी धनीमध. )

**या नाचूं या आनंदानें सुरुचिर गाणीं गाऊं या ; दावूं या अभिनय करिं या ॥ शिवसेवे यापरि या तनु या लावूं या ॥ धृ० ॥ होम हव्य तुपें, कोणि जपें, कोणि तपें ध्याति, घृत कर्म व्रपें कोणि लपें, कोणि सुत शिजविति, कुणि तनु जनिं विकिति, कुणि शिर करवतिं चिरुनियां ॥ १ ॥ तपति कोणि पंचाग्नी जलिंच कोणि संलग्ना धूम्रपान करि कुणि कुणि असुरि क्रिया ॥ श्रवणीं स्मरणीं मननीं भजनीं पुजुनि अंतीं जाती त्या ठायां ॥ जनन मरण हरण करुन भवभय करुं विलय मोक्ष साधाया साध्य तेंचि करुं मनिं धरुं शिव पदा या ॥ २ ॥**

**रंभा**—महानंदे, तुला बरेच दिवस सांगेन सांगेन म्हणतें ; हें पहा, तूं हा शंकराच्या पूजेचा नाद अगदीं सोडून दे.

**महानंदा**—काय म्हणून ग तो सोडूं ?

**रंभा**—अग, असा हा स्मशानवासी ईश्वर आपल्यासारख्या राजविलासी भक्तांच्या काय कामाचा ? शंकर, मारुति, दत्तात्रेय हे देव संसारी लोकांच्या मुळींच उपयोगाचे नाहींत. हे देव आपल्या भक्तांना शेवटीं आपल्यासारखेच कफल्लक करून सोडतात. त्यांतून शंकर तर आम्हांस मुळींच आवडत नाहीं.

**महानंदा**—भावना तसं फळ, हेंच देवाचं ब्रीद. तुम्हांला जर आवडत नाहीं, तर उद्यांपासून तुम्ही माझ्याबरोबर इथं येण्याची तसदी घेऊं नका; मी आपली एकटीच येत जाईन.

**सदानंदा**—पण आम्ही तुला तशी येऊं देणार नाहीं; आम्ही बरोबर येणारच.

**महानंदा**—बरोबर येणार, तर माझ्या आराध्यदेवतेला कुणीं नांव ठेवतां कामा नये. उलट सर्व जणींनीं माझ्याप्रमाणंच पूजा केली पाहिजे.

**सदानंदा**—तुझ्याकरितां पाहिजे तर करूं.

**महानंदा**—बरं, चला. आतां एक चांगलंसं गाणं म्हणूं आणि नंतर घरीं जाऊं.

**२ पद**—( भूप–दादरा–छांडो छांडो जी मोरी )

**नमो भूतेशा, तूतें महेशा, हिमाद्रिसुताधीशा आनंदवनविलासा ! ॥ धृ० ॥ वाहिली तव पदकमलीं, तन मन धनयुत सकलीं नत शिरावली ॥ अभय वर दे शुभद कर दे ॥ जनन मरण हरण करून ने पदिं ईशा ॥ गौरिशंकरा, जय शुभंकरा, अतां षडरि झणिं करा नाशा ॥ १ ॥**

( प्रदक्षिणा घालतात, ब्रह्मानंद येतो. )

**ब्रह्मानंद**—वारांगनेचा बंधु म्हणजे या जगांत कांहीं सामान्य व्यक्ति नाहीं. उगीच आपला जो उठेल तो म्हणेल कीं, 'मी गणिकेचा भाऊ होईन, तर तें त्याला साधायचं नाहीं; कारण ही जागा मिळवायला बाळपणापासूनच गंधर्वांप्रमाणं गातां यावं लागतं, किन्नरांप्रमाणं तंतुवाद्यांत नैपुण्य मिळवावं लागतं व अप्सरांप्रमाणं अभिनय करायला यावे लागतात. असं त्रैगुण्य संपादन करून शिवाय वडिलार्जित संपत्तीचा यथेच्छ उपभोग घेणाऱ्या आयतोबाशीं अलौकिक स्नेह संपादन करून, त्यांच्या वाडिलांनीं अगदीं गुपचुप रीतीनं खळग्यांत पुरून ठेवलेली गंगाजळी शहाजोग रीतीनं आपल्या बहिणीचे पदरांत टाकून त्या खळग्यांत त्यांची योजना करायला यावं लागतं, आणि या सर्व चौसष्ट कळा माझ्या एकट्याच्या ठिकाणीं वास्तव्य करीत आहेत, म्हणून येथील सर्व विश्वयोषितांनीं मतैक्यानं मला आपल्या भावाचं धुरीणत्व देऊन मोठ्या सन्मानानं हें सुवर्णपदक बक्षीस दिलं आहे; आणि असं पदक देण्याच्या मी लायकीचाही आहें. कारण—

**४ पद** — ( दिलदार दिलारा )

**मी नारिनरांचें तन मन धन झणिं वेधिन या नयनें ॥ चलबिचल करिन तरुणतरुणिमन सारिगम गाउन अभिनय दाउन ॥ धृ० ॥ नरेंद्र पार्थ जसा सोडि बाण उजव्यानें ॥ प्रसंगीं तोचि तेंचि योजितसे डाव्यानें ॥ परशुराम तसा मारि अरी शापानें ॥ कधिं काधिं छेदितसे शिर बाणचापानें ॥ १ ॥**

असो, चला. उगीच जास्त आत्मस्तुति करीत बसण्याचं हें ठिकाण नव्हे. कारण, इथं ती ऐकायला माझ्यावांचून दुसरं कोणी नाहीं; शिवाय ही आत्मप्रशंसा करीत बसण्याची वेळहि नव्हे. कारण, आज आमच्या घरीं सदानंदेचा गांधर्वविवाह आहे. तेव्हां पूर्वरंग करण्याकरितां सर्वजणींना लवकर बोलावून आण असं मातोश्रींनीं सांगितलं आहे. तर आतां तिकडेच जावं. ( पाहून ) वाहवा हो वाहवा ! शर्थ झाली आतां तुमची. आज आपल्या घरीं केवढं मोठं कार्य आणि तुम्ही आपल्या रोजच्यासारख्याच रेंगाळघाणा घालीत बसलांत; सदानंदे, लग्नाच्या दिवशीं असं रस्त्यावरून हिंडूं नये बाई; दृष्ट लागते.

**रंभा** —अगबाई, आज सदानंदेचा गांधर्वविवाह का आहे ? बरं, पण गंधर्व तरी कोण पाहिले आहेत ?

**ब्रह्मानंद** —गंधर्वांना हो काय तोटा ? कमलिनी प्रफुल्लित झाली म्हणजे भ्रमरांना ‘ या हो या ! ” असं कुणीं म्हणावं का लागतं ? ठेवणीचा शृंगार करून व थैल्यांच्या थैल्या हातांत घेऊन आईसाहेबांपुढं कित्येक गंधर्व तुला–मला करीत लाळ घोटीत आहेत. बरं, चला आतां; रेंगाळूं नका. ( जाऊं लागतात. )

**महानंदा** —अक्का, रोजच्यापेक्षां तुझं मुखकमल आज जास्त प्रफुल्लित दिसतं !

**सदानंदा** —होय, एखादे दिवशीं तुझंही असंच दिसेल.

**महानंदा** —दिसेल, पण कुलांगनेला शोभेल असं दिसेल.

**सदानंदा** —म्हणजे, तूं वारांगना नाहीं का होणार ?

**महानंदा** —होणार; पण कुलांगनेप्रमाणं वर्तन ठेवणार.

**सदानंदा** —म्हणजे पंचपक्वान्न सोडून कदान्नच खात राहणार ?

**महानंदा** —अक्का, आपली स्त्रियांची काया ही मानवसृष्टीच्या उत्पत्तीची पवित्र भूमि आहे. ती जितकी नेमस्त व पवित्र राखावी, तितका तिच्यापासून

उद्भवणारा अंकुर सुदृढ व तेजस्वी होतो. म्हणून मी अनेकदृष्टि वारांगनेपेक्षां एकदृष्टि कुलांगनेचीच योग्यता अधिक समजत्यें.

**सदानंदा**—अग, योग्यता काय, ज्याची जशी मानावी तशी असते.

**महानंदा**—छेः, छेः असं कसं ? शरिराचीं इंद्रियं जितकीं नियमित प्रमाणांत उपयोगांत आणावीं, तितकी त्यांत तेजस्विता जास्त. प्राचीन काळच्या महान् महान् पतिव्रतांचीं नांवं जीं आज अजरामर होऊन राहिलीं आहेत, तीं याच गुणानं. साध्वी गांधारीनं आपले नेत्र झांकून ठेवले, त्यामुळं त्यांत इतकी शक्ति उत्पन्न झाली कीं, ज्याकडे ते पहात तो वज्रदेही होई. प्राचीन काळीं जे अलौकिक पुरुष जन्माला आले किंवा सांप्रत काळीं येतात, त्यांचं अलौकिकत्व केवळ त्यांच्या मातापितरांच्या विषयोपभोगांच्या नेमस्तपणामुळंच होय; आणि म्हणून वारांगनेची योग्यता कुलांगनेपेक्षां कमी मानली जाते.

**सदानंदा**—आपली योग्यता तूं कमी समजतेस वाटतं ? अग, आपण हरिश्चंद्राच्या योग्यतेच्या आहोंत हरिश्चंद्राच्या.

**महानंदा**—त्या कशा ?

**सदानंदा**—हरिश्चंद्रानें आपल्या देहाचा एकच वेळ विक्रय केला, पण आपण रोजच्या रोज करीत असतों.

**महानंदा**—हा तूं आपला कांहीं तरी बादरायणसंबंध लावितेस !

**सदानंदा**—मग हल्लींच्या काळीं, सारख्या आडनांवांवरून कांहीं कांहीं लोक नाहीं का आपल्याला क्षत्रिय म्हणवीत ? तशाच आपण. बरं चल, उशीर होतो. सर्व जणी केव्हांच गेल्या ( जाते. )

**महानंदा**— **५ पद** ( गज्जल मैं फक्त हूं वो नही हूं ).

**हृद्भवनीं उद्भवोनी येति आशा निराशा ॥ सौख्य-दुःखा दुहिचीया देति कैशा प्रकाशा ॥ धृ० ॥ चिंत्तिं चिंती तसा कांत मिळोनिया मातें ॥ कधिं सेवीन का तैशा गृहिणी ऐशा सुखांशा ॥ १ ॥ येत मनीं ऐसेंहि कीं व्यर्थ जन्म जाईल हा ॥ कथि मातें आतां ईशाऽगम्यशेषा विशेषा ॥ २ ॥**

अक्कासाहेब म्हणतात कीं, आम्ही हरिश्चंद्राच्या योग्यतेच्या आहोंत. त्या सत्त्वधीर राजेश्वराचं नांव उच्चारण्याची तरी आमच्या अपवित्र मुखाची योग्यता

आहे का ? त्यानं स्वप्नांत दान केलं, पण तें जागृतपणीं कबूल केलं; आणि आम्हीं जागृतपणीं कुणाचं ऋण घेतलं, तर तें स्वप्नांतदेखील कबूल करीत नाहीं. ज्यानं कपटानं सर्वस्वापहार केला, त्यानंच क्रोधानं लत्ताप्रहार केला. तरी तो हरिश्चंद्रानं निमूटपणानं सहन केला. उलट आम्हांला जो भोळेपणानं सर्वस्व अर्पण करतो, त्यानं लीनपणानं जरी कांहीं विचारलं, तर त्यालाच आम्ही लत्ताप्रहार करतों. साध्वी तारामतीनं विपन्नावस्थेंत देखील कुणाचं उच्छिष्ट भक्षण केलं नाहीं, आणि आम्ही तर संपन्नावस्थेंत देखील कुणाच्याही मुखांत मुख घालतों. बाळ रोहसेनानं स्वतःला जरूर असतां लोकाला आपले पायपोस दान केले; आणि आमचीं बाळं कारण नसतां रोज कुणाचे ना कुणाचे तरी पायपोस घेत असतात. परमेश्वरा, परंपरा चालत आलेल्या रूढीच्या अतिरेकानं खालावत चाललेल्या अशा वारांगनेच्या कुळांत मला कशाला जन्म दिलास ?

**६ पद** ( भैरवी–गर्भा–बारोपियाकांता निन. )

**शिव शिव जन्मा आलें का अशा ॥ वारांगना–देह दुष्कीर्तिचें गेह ॥ धृ० ॥ लोकीं पती एक नाहीं कुणी ॥ येतो गृहीं तो होतो धनी ॥ चित्तीं न सद्भाव चिंती दुजा भाव ॥ १ ॥ नाये कळूं ऐशि बोले हळू ॥ द्रव्याविशीं मात्र जैसी जळू ॥ चित्तीं न सद्भाव चिंती दुजा भाव ॥ २ ॥ माया दया कांहीं नाहीं मनीं ॥ कामांध लोकां डसे सर्पिणी ॥ निष्काम न प्रेम करणें असा धर्म ॥ ३ ॥ माता पिता बंधु ऐशा रितीं ॥ कानीं कपाळीं कीं सांगती ॥ निष्काम न प्रेम करणें असा धर्म ॥ ४ ॥** ( जाते. )

---

## प्रवेश २ रा

( ट्रॅन्स्फर सीन—शिवालयाचा इंद्रलोक )

**[ पात्रें—इंद्र, वरुण, वायु, बृहस्पति, वसिष्ठ, विश्वामित्र व नारद. ]**

**नारद**—देवेंद्रा, मृत्युलोकची महानंदा खरोखरीच अशी आहे.

**वरुण**—मुनिश्रेष्ठ, अशी म्हणजे कशी ?

**नारद**—अशी म्हणजे, जिला जशी या शब्दानं दुसरी कोणी दाखविता येणार नाहीं तशी.

**इंद्र**—तर मग आमच्या राज्यापेक्षां मृत्युलोकाचं राज्य श्रेष्ठ म्हणायचं ?

**वायु**—तें कसं देवेंद्रा ?

**इंद्र**—स्वर्गलोकापेक्षां मृत्युलोकीं विलासाचे पदार्थ जर अधिक उत्तम तऱ्हेचे निर्माण होऊं लागले, तर आम्ही मृत्युलोकीं असतांना शंभर अश्वमेध केले, गोब्राह्मणांचा प्रतिपाळ केला, प्रजाजनांना सर्वत्र समदृष्टीनें यथान्याय वागवलं, देशाच्या उत्कर्षांकरितां अविश्रांत श्रम केले, अशा रीतीनं तेथील आयुष्यक्रम संपवून या सिंहासनावर अधिष्ठित झालों, तें सर्व व्यर्थ झालं !

**वसिष्ठ**—काय हे अज्ञान ! देवेंद्रा, अरे, सत्कर्मं कधीं व्यर्थ झालीं आहेत ?

**इंद्र**—तर मग मृत्युलोकच्या सर्व प्राणिमात्रांपेक्षां व स्वर्गांतील देवांपेक्षां सर्वांत अति उत्तम विलासाचा पदार्थ माझ्या संग्रहांत असणं योग्य असून तो ब्रह्मदेवांनीं मृत्युलोकांत कसा उत्पन्न केला ? किंवा नारदस्वामी प्रतिपादन करतात त्याप्रमाणं ती वारांगना माझ्या वारांगनेपेक्षां अधिक सुंदर नसावी, असं आपलं म्हणणं ?

**वसिष्ठ**—देवेंद्रा, आम्ही काय, वृद्ध माणसं. तेव्हां अमुक वारांगना कशी, किंवा तमुक कशी, याची परीक्षा आम्हांला काय असणार ? ' नानारत्ना वसुंधरा '. तेव्हां नारदमुनी म्हणतात तेंही असेल. तरी पण आपल्या सभेत विश्वामित्रासारखे पंडित आहेत, त्यांना या विषयाची अनुभाविक माहिती आहेच.

**इंद्र**—कसं, विश्वामित्र ऋषे ?

**विश्वामित्र**—माझं मत असं आहे कीं, मृत्युलोकांत देवलोकाहून अधिक सुस्वरूप वारांगना असणंच शक्य नाहीं.

**नारद**—हें आपण कशावरून सांगतां ?

**विश्वामित्र**—स्वानुभवावरून.

**नारद**—तो कसा काय आहे ?

**विश्वामित्र**—मृत्युलोकीं मी राजविलास भोगीत असतां माझ्यासमोर कित्येक सुस्वरूप वारांगना नृत्यगायन करीत ; पण मी त्यांपैकी एकीच्या देखील प्रेमपाशांत बद्ध झालों नाहीं. तोंच देवेंद्रानं माझ्याकडे येथील एकच वारांगना

पाठविली. व तिनं नुसता नेत्रकटाक्ष फेंकतांच मी श्वान होऊन तिच्यामागं नृत्य करीत आलों.

**नारद**—खरं कीं काय ?

**विश्वामित्र**—होय, देवर्षे. बरं असो, बुरं असो. या वाणींतून असत्य म्हणून निघायचं नाहीं, याचा अनुभव सर्वांना आहेच.

**बृहस्पति**—होय; मिश्वामित्र ऋषि मेनकेच्या मागं श्वान होऊन इथं एकदां आले होते खरे.

**नारद**—आले असतील; मात्र त्यांत विश्वामित्र ऋषीचं स्त्रीलंपटत्व अधिक दिसून येतं. पण मेनकेच्या स्वरूपाचं अलौकिकत्व कांहीं यावरून सिद्ध होत नाहीं. खरोखर देवेंद्रा, महानंदेला पाहतांच मला असं वाटलं—

**७ पद**—( बारोबा नरहरी. कानडी–दादरा )

**सुंदरी मज भासली ॥ रतिच दुसरी अवतरली ॥ धृ० ॥ ग्रामिंचा त्या तोचि भूप ॥ पृथ्वीमाजीं निस्सिम रूप ॥ पाहोनियां तो कंदर्प ॥ जाइल बलि विरहानलिं ॥ १ ॥ रत्नमय दंडयुक्त ॥ रत्नखचित छत्र ढळत ॥ रत्नजडित पादुकाही ॥ झळकति किति चरणकमलिं ॥ २ ॥ वार युवति म्हणवि तरि ही ॥ वश्य नोहे इंद्रा तुजही ॥ कोटी लिंगें करुनि प्रत्यहीं ॥ तोषवि शिव लक्ष त्रिदळीं ॥ ३ ॥**

**इंद्र**—देवर्षे, मृत्युलोकची प्रजा माझ्या देवलोकच्या प्रजेपेक्षां मोठी राजनिष्ठ, खूप शूर, महा विद्वान्, फार धनसंपन्न व अतिशय स्वरूपवान् अशी असणारच नाहीं आणि आहे असं आपण प्रतिपादन कराल, तर त्यावर मी मुळींच भरंवसा ठेवणार नाहीं. आपण जों जों महानंदेची प्रशंसा करतां, तों तों मला माझ्या वारांगनांचा अधिकच अभिमान वाटून मी आपल्याला निश्चयात्मक सांगतों कीं—

**८ पद**—( कुलपा विनती तोरि. सोहनी एका )

**अमरभुवनिं याहुनीहि । केवळ रति गुणरूपांनीं । नंदनवनिं चमकति किति वारकामिनी ॥ धृ० ॥ रंभा ती जणुं मृडानी । उर्वशिला सरि न कोणी । ब्रह्माही लटपटोनि जाइल कीं बघुनि ॥ १ ॥**

**नारद**—काय म्हणतोस, तुझ्या स्वर्गलोकच्या वारांगनांना पाहून ब्रह्मदेव म्हणजे आमचे तीर्थरूप देखील लटपटून जातील ? देवेंद्रा, अशा उपरोधिक भाषणांनीं, महानंदेविषयीं मी केलेली प्रशंसा म्हणजे अर्भकानं केलेल्या अरण्यरोदनाप्रमाणं दर्शवितोस काय ?

**बृहस्पति**—महानंदा वारांगना असून देवेंद्राला देखील वश होणार नाहीं, असं आपण मघांशी प्रतिपादन केलं, त्याचं हें प्रत्युत्तर आहे असं समजा म्हणजे झालं.

**इंद्र**—छे-छे देवर्षे, स्वाश्रित जनांच्या स्वरूपाविषयीं अभिमान वाटून, सत्पथापासून कधी न ढळणारे चतुर्वेदांचे वक्ते देवाधिदेव ब्रह्मदेव यांच्या नांवाचा केवळ उच्चार मी केला. वादविवादांत प्रतिस्पर्ध्याची मानखंडना करणाऱ्या ग्राम्य लोकांप्रमाणं " शेषं कोपेन पूरयेत् " असं कांहीं मीं भाषण केलं नाही. त्यांतूनही आपल्याला कांहीं शंका असेल तर मी आपली क्षमा मागतों.

**वसिष्ठ**—देवर्षे, उपरोधिक भाषणांनी आजपर्यंत आपण देवादिकांमध्यें कोप माजवून कलह उत्पन्न करीत आलांत आणि आज देवेंद्रानं तसं भाषण करतांच तुम्हांला कोप आला हे आश्चर्य आहे. असो. त्याचा उपशमही लवकर झाला हें ठीक झालं.

**विश्वामित्र**—अंगीं अधिक सामर्थ्य असून, प्रतिपक्षानं केलेल्या निर्भीड पण सत्य अशा भाषणापासून कोप उत्पन्न झाला कीं आपलंच मस्तक विकारवश झालं आहे असं खास समजावं. मग सत्य भाषण करणारांनीं क्षमा काय म्हणून मागायची ?

**नारद**—एका अर्थी तेंही खरंच आहे. बरं देवेंद्रा, ज्यांच्याविषयीं तुला इतका अभिमान वाटतो, त्या तुझ्या देवलोकच्या वारांगना आहेत कसल्या त्या तरी मला पाहूं दे.

**इंद्र**—कोण आहे रे ? द्वारपाल, नंदनवनांत जा आणि रंभा, मेनका, ऊर्वशी, तिलोत्तमा वगैरे सर्व अप्सरांना इकडे घेऊन ये. ( द्वारपाल जातो. )

**विश्वामित्र**—देवर्षे, आपण या देवलोकच्या वारांगनांचे नादीं लागूं नका. फार हाल होतील.

**नारद**—छे, छे, आपण ज्यांच्या नादी लागून श्वान झालांत त्या स्वरूपानं कशा आहेत इतकंच मी पाहणार आहें. मला तो नाद नको व हालही नकोत.

**वसिष्ठ**—देवेंद्रा, अरे, हे देवर्षि कांहीं तरी वाद उपस्थित करण्याच्या मसलतींत असतात. तूं त्यांच्या नादीं लागशील तर कांहीं तरी संकटांत पडशील. महानंदा रंभा-मेनकेपेक्षां अधिक स्वरूपवान् असली तर तुला कमीपणा कोणता ?

**विश्वामित्र**—असं कसं म्हणतां, वसिष्ठ ऋषे ? मृत्युलोकांतील यज्ञयागादि पुण्यकर्मे, शमदमादिकांचे देहकष्ट व दानधर्मादि संपत्तिव्यय हीं केवळ स्वर्गलोकच्या विलासप्राप्तीकरितां होत. तो विलास करण्याचं मुख्य ठिकाण म्हणजे गुणरूपसुंदरी वारांगना. त्या जर मृत्युलोकीं उत्पन्न होऊं लागल्या तर स्वर्गाला मृत्युलोकापेक्षां अधिक महत्त्व तें काय ?

**वसिष्ठ**—देशादेशाचं महत्त्व हें तेथील वारयोषितांच्या कमीअधिक स्वरूपावर असतं असं कोणताही राजकारणी पुरुष कबूल करणार नाहीं.

**विश्वामित्र**—पण तसं राजकारण इथं आहे कुठं ? सर्वांनीं अमृत प्यायचं व विलास भोगायचे. स्वर्गाचं राज्य विलासासाठीं आहे. अनेकांनीं कष्ट करून एकट्यानं चैन करण्याचं हें राज्य नव्हे.

**नारद**—ब्रह्मर्षे, राजर्षि म्हणतात तेंच योग्य आहे.

**वसिष्ठ**—परंतु देवर्षे, त्याचा गर्भितार्थ माझ्या चांगला लक्षांत आला नाहीं.

**नारद**—आतां काय सांगावं ? अहो वसिष्ठऋषे, हा विषय तरुण मंडळींचा आहे.

**वसिष्ठ**—होय का ? तर मग देवगुरो, आपल्यासारख्या वृद्धांचं आज इथं कांहीं काम नाहीं; चला, आपण स्नानसंध्या तरी करूं. (जातात.)

**नारद**—देवेंद्रा, जाऊं दे त्यांना. आज हा महत्त्वाचा वाद आपण संपवूं.

(द्वारपाल प्रवेश करतो.)

**इंद्र**—काय रे, एकटाच परत आलास ?

**द्वारपाल**—देवाधिदेवा, नंदनवनांत कोणी वारांगना नाहींत.

**वरुण**—आच्छोदसरोवराकडे जाऊन घेऊन ये. त्या जलक्रीडा करीत असतील.

**द्वारपाल**—तिथंही पाहून आलों सरकार. फक्त चेटकुळयाच नजरेस पडल्या.

**वायु**—मूर्खा, तिथं नसल्या तर कल्पवृक्षवाटिकेंत जा. हवा खात फिरत असतील.

**द्वारपाल**—तिकडूनही पाहून आलों सरकार. तिथं फक्त माकडं झाडांवर उड्या मारीत आहेत.

**इंद्र**—अरे, चहूंकडे जाऊन त्यांना शोधून घेऊन ये. म्हणावं, देवर्षि नारद-मुनि आले आहेत; तेव्हां त्याना मोह पडेल असा शृंगार करून या.

**द्वारपाल**—देवाधिदेवा, स्वर्गलोकचा कानाकोपरा पाहून आलों; पण एकदेखील स्त्री नजरेला पडली नाहीं.

**इंद्र**—म्हणजे? याचा अर्थ काय बरं, वरुणा?

**नारद**—याचा अर्थ असा कीं, तुझ्या स्वर्गलोकच्या देवांगना मी सांगतो त्या मृत्युलोकच्या महानंदेच्या स्वरूपाला भुलून तिच्या सख्या होऊन राहिल्या आहेत. पाहिजे तर प्रत्यक्ष जाऊन पहा; आणि आतां ओघालाच आलं म्हणून सांगतों, तुझ्या ऊर्वशीला पाहून जसे आमचे तीर्थरूप लटपटून जातील तसे आमच्या महानंदेला देवेंद्रच काय, पण देवेंद्राचा देवेंद्रदेखील वश करूं शकणार नाहीं.

**इंद्र**—वारांगना असून वश होणार नाहीं म्हणतां?

९ **पद**—( काभोद–एक्का–मोरे नई लगन लगिरे )

**अशि कोण वारवनिता । पाहतां धनवता न होतां अनुरत करित सतत शिवव्रत सतिजनवत ॥ धृ० ॥ वन्हींत शांती । मैंदी विरक्ति । भजनीं प्रीती ऐसें मत ॥ १ ॥**

( सिंहासनावरून खालीं उतरतो. )

**नारद**—देवेंद्रा, हातच्या कांकणाला आरसा कशाला? तूं आतां मोठ्या त्वेषानें सिंहासनावरून खालीं उतरलाच आहेस, तो असाच मृत्युलोकीं जा आणि त्या महानंदेला वश करून घेऊन ये, म्हणजे मी होय म्हणेन. मी जातों आतां.

**विश्वामित्र**—देवेंद्रा, जाच तूं. तुला खात्रीनं यशप्राप्ति होणार!

**नारद**—मेनकेच्या कामांत यांना झाली तशी.

( नारद, विश्वामित्र, वायु जातात. )

**वरुण**—देवेंद्रा, वादाच्या भरांत तूं पण केलास खरा; पण आतां पुढं?

**इंद्र**—त्या पणाप्रमाणं महानंदेला वश करून स्वर्गांत आणायची.

**वरुण**—पण ती वश व्हावी कशी?

**इंद्र**—तूं तरी मला त्या नारदाप्रमाणंच भोळा दिसतोस. अरे, वेश्या या वस्तूच्या ठिकाणी प्रेम करतात; व्यक्तीच्या ठिकाणी नव्हे. अमुक एक वेश्या माझ्या ठिकाणीं फार अनुरक्त आहे असं जर कोणी म्हणेल तर त्याच्यासारखा मूर्ख दुसरा कोणी नाही असें मी समजतो. एखाद्याच्या गळ्यांत मोत्यांचा हार पाहिला की वेश्या त्याच्या गळ्यांत पडलीच. मग तो गळा माणसाचा असो की पशूचा असो.

**वरुण**—म्हणजे ? वेश्यांना द्रव्यवासना फार, कामवासना मुळीच नाही, असं तुझं म्हणणं ?

**इंद्र**—आहे ; पण ती बहुदक्षिणेच्छु भिक्षुकांच्या क्षुधेप्रमाणं.

**वरुण**—म्हणजे कशी ?

**इंद्र**—मनाप्रमाणं दक्षणा न मिळतां भिक्षुकांना पंचपक्वान्नांचं आकंठ भोजन मिळालं, तरी त्यांची क्षुधा तृप्त होत नाही; तशी वेश्येला तिच्या इच्छेप्रमाणं बिदागी मिळेपर्यंत तिची कामवासना शमन होत नाही. म्हणून माझी अशी खात्री आहे की, स्वर्गलोकचे चार–दोन ठळक अलंकार महानंदेच्या गळ्यांत घातले की तिला दाव्याप्रमाणं ओढीत आणतां येईल.

**वरुण**—बरं, आतां मृत्युलोकी कसं जायचं ?

**इंद्र**—या दिव्य देहाचा त्याग करून, पंचभूतात्मक देह धारण करून, मोठ्या धनाढ्य व्यापाऱ्याच्या वेषानं, नंदिग्रामांत प्रवेश करून, पुढ वेळ पडेल त्या रीतीनं स्वीकृत कार्याला आरंभ करायचा. मग पाहू.

१० **पद**—( मारवा–झंपा–नीमधगमरे. )

**हीं कोण कामिनी भुवनीं अशी सुगुणी नवतरुणी असुनी न करि जनिं वश कुणी ॥ धृ० ॥ नरवेष धरुनी तिजसी वश करोनी आणितों सहज यानीं ॥ १ ॥ रवि जेविं नलिनी सहजीं विकसवोनि धरितो हृदिं करांनीं ॥ २ ॥**

( इंद्र व वरुण जातात. नारद येतो. )

**नारद**—मातोश्रीला वश करून आणायला चिरंजीव गेले आहेत. जाऊं द्यात. फजिती होऊन येतील तेव्हां समजेल. पण यांना नेहमी फजिती करून

घेण्याची संवयच आहे. परस्त्रीचा अपहार केल्याबद्दल एकदां या स्वारीच्या सर्वांगाला छिद्रं पडलीं; पण त्या छिद्रांचे नेत्र झाल्यामुळं, परस्त्रीचा अभिलाष करणं हें एक त्यांना भूषणच वाटूं लागलं आहे. पण म्हणावं, राजेश्री, मृत्युलोकचा वेश्याविलास स्वर्गलोकच्या विलासापेक्षां फार निराळा आहे. तिथं छिद्रांचे नेत्र होणं बाजूलाच रहातं, पण असलेले नेत्र, नाक व कान यांचा मागमूस जाऊन, एका सरळ रेषेंत सहा छिद्रं येतात. असो; आतां आपण काय करावं बरं? बस्स! असंच कैलासावर जाऊन, हा वणवा तातांच्या तृतीय नेत्रानं जास्त भडकायला लावून आपण क्षीरसागरांत दडून बसावं. पण नको. या प्रयोगाला प्रारंभ मीं केला आहे, तेव्हां त्याचा शेवटही मीच करणार व तो कसा काय साधला म्हणून ईश्वरांना विचारणार. हो! पण या प्रयोगांत या एकट्या सूत्रधारानं भागायचं नाहीं. कोणी तरी नटी पाहिली पाहिजे. (पाहून) वाहवा! आजपर्यंत कोणाला कांहीं संकट प्राप्त झालं कीं त्या ठिकाणीं मी हजर होत होतों. आज मलाच संकट प्राप्त झालं आहे. तेव्हां हें पहा, माझे नारदस्वामी इकडेच येत आहेत. तर त्यांनाच आपली नटी करावी.

(तुंबरू ऋषि प्रवेश करतात.)

**तुंबरू**— ११ पद —(भूप–त्रिवट–तुम हम संग जिन.)

**हर हर शिव शिव बोल सुवदना॥ शिव पद कमल पहा नयना। शिवचि परिस श्रवणा ॥ धृ०॥ शिवालयीं पद जाउंत राहुंत। वाहुत हस्त सुभूषणा शिव निदिध्यास मना॥ १॥**

**नारद**—नमोनमः, तुंबरूस्वामी.

**तुंबरू**—नमोनमः नमोनमः, कोण? नारदस्वामी? आपण इकडे कोणीकडे?

**नारद**—आपल्याकडेच निघालों होतों, तों आपणच आलांत.

**तुंबरू**—हं? कां बरं?

**नारद**—उगीच शब्द टाकणं व्यर्थ होऊं नये, वचन द्या, म्हणजे काय काम तें सांगतों.

**तुंबरू**—पण वचन काय म्हणून?

**नारद**—काम करतों म्हणून.

**तुंबरू**—आपलं काम कांहीं वाईट असणार नाहीं; हें घ्या वचन.

**नारद**—आपण एवढ्या चातुर्मासांत माझ्यासाठीं बायको व्हा.

**तुंबरू**—काय म्हणतां ? बायको होऊं ? हें मला चातुर्मासांत चांगलं व्रत करायला सांगतां.

**नारद**—अहो, म्हणजे माझी बायको नव्हे. बायको म्हणजे स्त्री.

**तुंबरू**—बायको म्हणजे स्त्री ? हें नव्हतं मला माहीत. जरा आणखी स्पष्ट करून सांगा.

**नारद**—म्हणजे मी होतों दास आणि तुम्ही व्हा दासी.

**तुंबरू**—फार छान; म्हणजे तुम्हीं लोकांचे पाय चेपावे आणि मीं भांडीं घांसावीं.

**नारद**—भांडीं वगैरे कांहीं घांसायचीं नाहींत.

**तुंबरू**—मग दासी होऊन काय करायचं ?

**नारद**—गायन, नर्तन, अभिनय.

**तुंबरू**—मग त्याला स्त्री होण्याचं कारण नाहीं. तें मला या पुरुषवेषानं करतां येईल.

**नारद**—छे, छे; पुरुषवेषानं नाचायला व हावभाव करायला लागलांत तर लोक हंसतील. स्त्री होण्यांतच जास्त रंग आहे.

**तुंबरू**—जास्त रंग आहे ? पण हा असा नाटकी रंग आणायचा कुठं ?

**नारद**—मृत्युलोकीं एका वारयोषितेच्या घरांत.

**तुंबरू**—सेवा करायला ठिकाण पण फार पवित्र काढलंत.

**नारद**—मग काय एखाद्या अग्निहोत्र्याच्या घरांत गात नाचत बसायचं ? तुम्ही भितां कां ? मीही पण तिच्या घरीं येणाऱ्या एका धनवान् यजमानाचा दास होणार आहे.

**तुंबरू**—तुमचं ठीक आहे; पण मी जिची दासी होऊन राहणार तिच्या एखाद्या साजिंद्यानंच माझ्यावर वक्र दृष्टि ठेवली तर ?

**नारद**—मग त्यांत काय आहे ? मी नाहीं का साठ संवत्सरं एका ऋषीची पत्नी झालों ? अहो, त्याच्यापासून मला साठ पुत्र देखील झाले.

**तुंबरू**—पण मी म्हणतों इतका खटाटोप करून करायचं काय ? पाहिजे तर या चातुर्मासांत शेषपाई भगवंतापुढं रोज प्रहर प्रहर गायन करायला सांगा; गातों पाहिजे तर. सत्यलोकीं आपल्या तीर्थरूपांसमोर गायत्रीचीं पुरश्चरणं करायला

सांगा, करतों; पाहिजे तर कैलासनाथासमोर रुद्राचीं आवर्तनं करायला सांगा, करतों; असं कांहीं पवित्र काम करायला सांगायचं सोडून म्हणे 'वारयोषितेची दासी व्हा.' अशी अमृत सोडून आंबिल पिण्याची इच्छा कशासाठीं?

**नारद**—मातोश्रींकरितां केली पाहिजे.

**तुंबरू**—कुणाची मातोश्री?

**नारद**—तुमची, माझी, साऱ्या जगाची.

**तुंबरू**—हें पहा, काय तें स्पष्ट सांगा. असा शब्द सोडलेला धडा मला समजत नाहीं.

**नारद**—(त्याचे कानांत सांगून) अशाकरतां तुम्हीं दासी व्हायचं आणि (पुनः कानांत सांगून) अशाकरतां मीं दास व्हायचं.

**तुंबरू**—मग इतका वेळ कां नाहीं हें सांगितलंत?

**नारद**—तर मग आतां व्हा बायको पाहूं.

**तुंबरू**—अशा उघड्या मैदानांत?

**नारद**—बरं तर, तुम्ही त्या झाडाआड जा आणि मी या जातों.

(वेषांतर करतात.)

**१२ पद**—(सारंग-केरवा. हमदम देखे)

**नटजन-वेष खचित गमतीचा॥ बहुत हिमतीचा अमित किमतीचा ॥ धृ० ॥ अंतर्बाह्य विरोध कृतीचा॥ गुप्त शोक वरि हास्यरसाचा ॥ १ ॥ बाह्यांगीं नव सुंदर योषा॥ अंतरिं अश्व निमा पुरुषाचा ॥ २ ॥**

(नारद व तुंबरू जातात. ब्रह्मानंद येतो.)

**ब्रह्मानंद**—भिक्षुक लोक श्राद्धाचं आमंत्रण आलं कीं त्या दिवशीं दोन दोन प्रहर स्नानसंध्या वाढवून मालकाचा घोंटाळा करतात, तसे आमचे साजिंदे गाण्याच्या ऐन वेळेला गणिकेचा खोळंबा करतात. आमचे तबलेपटु व सारंगी-बहादुरांचा तिसऱ्या प्रहरापासून कुठं पत्ता नाहीं. बेटे दुपारीं ओ येई तोंपर्यंत जेवले आहेत; आणि आतां तें पचविण्यासाठीं कुठं तरी गांजा फुंकीत पडले असतील झालं! तेव्हां आतां प्रत्येक घरांत शिरून त्यांचा शोध करण्यापेक्षां रस्त्यानं

मोठ्यानं हांका मारीत जावं म्हणजे कुठं असतील तिथून येतील. अहो तबलेवाले, तबलेवाले हो, अहो सारंगीवाले, अहो, चला हो चला लवकर. सर्व गाणारणी जमल्या आहेत हो.

( इंद्र व वरुण व्यापाऱ्याच्या वेषानं येतात. )

**वरुण**—देवेंद्रा, हा पहा कोणी मनुष्य गाणारणी जमल्या म्हणून आमंत्रण देत चालला आहे. तर चल, आपणही त्याच्या पाठोपाठ जाऊं. म्हणजे आपल्याला या गांवच्या सर्व वारांगना एकाच ठिकाणीं पहावयास सांपडतील.

**इंद्र**—ठीक आहे, चल. अरे, ए भल्या मनुष्या, जरा वेळ उभा राहून आमच्याशीं दोन शब्द बोलशील का ?

**ब्रह्मानंद**—हो, हो, दोनच कां हो ? पात्रापात्र पाहून दोन हजार सुद्धां बोलेन. बरं, आपण कोण, नांव काय, राहण्याचं ठिकाण कोणतं व इथं येण्याचं प्रयोजन काय, सांगा पाहूं.

**वरुण**—आम्ही व्यापारी आहोंत. यांचं नांव पुरंदरशेट व माझं नांव आप्पतिशेट.

**ब्रह्मानंद**—वाहवा ! नांवं तर अगदीं देवमाणसांचीं दिसतात. बरं, रहाण्याचं ठिकाण ?

**वरुण**—अमरावती.

**ब्रह्मानंद**—म्हणजे मृत्युलोकची देवनगरीच. देवलोकची हीं देवमाणसं कोणा तरी देवांगनेबरोबर अमृतपान करण्याकरितांच फिरत असणार. बरं, इथं येण्याचं प्रयोजन ?

**वरुण**—तें फार नाजूक आहे.

**ब्रह्मानंद**—म्हणून तर मी विचारतों आहें ; ओबडधोबड कामांत मी मुळींच लक्ष देत नाहीं.

**वरुण**—बरं, तुमचं नांव व धंदा अगोदर आम्हांला सांगा ; म्हणजे आमच्या नाजूक कामांत तुमचा उपयोग होईल का पाहून नंतर सांगूं.

**ब्रह्मानंद**—माझं नांव ब्रह्मानंद. मी इथल्या सर्व सुस्वरूप व धनाढ्य वारयोषितांचा बंधु आहें. अर्थात् माझा धंदा तुमच्यासारख्यांचा व आमच्या बहिणींचा परिचय करून देणं. सांगा, आतां तुमचं काम याहून नाजूक आहे कीं काय तें.

**वरुण**—नाहीं, नाहीं. अगदीं हेंच. बरोबर ओळखलंत.

**ब्रह्मानंद**—ओळखणारच ; आपल्यासारखीं रंगेल माणसं रस्त्यानं काय उद्देशानं फिरतात, हें ओळखून त्यांच्याशीं परिचय पाडणं हेंच आमच्या धंद्यांतील मुख्य कसब.

**वरुण**—तें कसं ?

**ब्रह्मानंद**—म्हणजे कुणीही तरुण मनुष्य रस्त्याच्या दोन्ही बाजूंकडे शोधक बुद्धीनं पाहात जातांना दिसला, म्हणजे तो ईश्वरनिर्मित सृष्टिसौंदर्य पाहातो आहे कीं मानवनिर्मित सौंदर्य पाहातो आहे, हें आम्ही त्याच्या दृष्टीवरून ताबडतोब ओळखतों.

**इंद्र**—म्हणजे ईश्वरनिर्मित सृष्टिसौंदर्य पाहातांना मनुष्याला आपल्या दृष्टींत जी एकाग्रता धारण करावी लागते, तितकी मानवनिर्मित सौंदर्य पाहातांना लागत नाहीं, असंच आपलं म्हणणं कीं काय ?

**ब्रह्मानंद**—छे, त्याच्या अगदीं उलट.

**वरुण**—म्हणजे ?

**ब्रह्मानंद**—म्हणजे मानवनिर्मित सृष्टिसौंदर्य पाहातांना तरुण लोकांची दृष्टि एकाग्र होत असते, तीच ईश्वरनिर्मित स्त्री या पदार्थाकडे पाहातांना ढिली पडून, मिशाला पीळ घालणं, धोतराचे कांठ सांवरणं, हातांतील काठी ऐटींत धरणं, इत्यादिक पुरुषार्थांनीं आपलंच सौंदर्य व्यक्त करण्याकडे द्विधा होते. त्यावरून हे राजेश्री कोणत्या उद्देशानं सहल करीत आहेत, हें आम्ही चट्दिशीं ओळखून आतां तुमच्याशीं केली त्याप्रमाणं पट्दिशीं ओळख करून घेतों.

**इंद्र**—वाहवा ! एकंदरींत हें सर्व बुद्धिकौशल्य तुम्हीं आमच्याच गळ्यांत घातलंत.

**ब्रह्मानंद**—आणखी असे कित्येक अलंकार तुमच्या गळ्यांत घालावयाचे आहेत. ( उघड ) बरं, तुमचं नाजुक काम काय तें कळवा.

**इंद्र**—या गांवीं महानंदा म्हणून कोणी गणिका आहे, तिच्याशीं स्नेह करण्याचा माझा विचार आहे.

**ब्रह्मानंद**—महानंदा कीं सदानंदा ?

**इंद्र**—कोण रे वरु—नव्हे आप्पतिशेट ! महानंदा नव्हे ?

**वरुण**—महानंदाच. सदानंदा नव्हे. आपल्याला त्या देवर्षि—नव्हे गोसाव्यानं हेंच नांव सांगितलं.

**ब्रह्मानंद**—हा त्याला वरु म्हणाला व तो देवर्षीनं सांगितलं म्हणाला, यावरून हे कोणी लफंगे असावेत व महानंदेशी स्नेह करण्यांत यांचा कांही अनिष्ट हेतु असावा; तर आपणही आतां ठकाला महाठक बनावं. (उघड) मग कोण? महानंदा की सदानंदा? पहा, सदानंदा असेल तर थोडक्यांत काम होईल आणि महानंदा असेल तर फार खर्च येईल.

**इंद्र**—येऊं द्या; कुबेराचा भांडारखाना घेऊन येऊं.

**ब्रह्मानंद**—पण त्यासाठीं आधी स्वर्गाला जावं लागेल!

**इंद्र**—जातां येईल; पण आधी ती कशी आहे तें तर पाहूं द्या.

**ब्रह्मानंद**—आणखी एक अट आहे. माझ्या श्रमाबद्दल माझ्या गंधर्व-गायनशाळेला कांहीं तरी मोठी देणगी दिली पाहिजे.

**इंद्र**—आपली गंधर्व गायनशाळा ती कोणती?

**ब्रह्मानंद**—म्हणजे ज्या ठिकाणीं शिकलं असतां, बदसुरे व बेताल गाणारे-देखील गंधर्वाची पदवी धारण करतात, ती माझी गंधर्व गायनशाळा.

**इंद्र**—वाहवा! असं उच्च प्रतीचं शिक्षण देतो तरी कोण?

**ब्रह्मानंद**—कोण म्हणजे? मी. तुम्ही मला काय समजतां?

**१३ पद**—(कारेनारे दिलभरिया.)

**मजसम सुखि न कुणी, गुणी न कुणी, सकल त्रिभुवनीं ॥ धृ० ॥ बांधुनि चाळ नाचुनि चाल भाव करुनि गातों ॥ सागग रेमम गपप मधध पनीनी धसासा मगरेसा पमगरेसा रेसानीधपध निसा-निधपम गरेसा ॥ १ ॥**

**वरुण**—पुरे पुरे. आपण गुणी आहांत, हें आम्हांला कबूल आहे.

**ब्रह्मानंद**—शारीरिक व मानसिक यांपैकीं कोणतेही श्रम न पडतां यथेच्छ चैनीनं आयुष्यक्रम चालविणारे या जगांत तीन प्राणी आहेत, त्यांपैकीं मी एक असून शिवाय मी सर्वगुणसंपन्न व सर्वांगसुंदरही आहें. तेव्हां माझ्यासारख्या सत्पात्र मनुष्याला मदत करण्याचं वचन देत असाल तरच मी तुमचं काम करतों.

**इंद्र**—कबूल, हें घ्या वचन. (नारद व तुंबरू प्रवेश करतात.)

**नारद**—उगा ताई. रडूं नको. हा पहा गांवचा राजमार्ग आला. आतां लवकरच आपली कुठं तरी सोय लागेल.

**ब्रह्मानंद**—काय रे, तुम्ही कोण ?

**नारद**—महाराज, आम्ही गरीब बहीणभाऊ आहोंत.

**इंद्र**—तुमचीं नांवं काय ?

**नारद**—माझं नांव नारळ्या व इचं नांव तुंबा.

**ब्रह्मानंद**—काय शिंच्यांचीं नांवं ? नारळ व कडू भोंपळा म्हणे !

**नारद**—महाराज, देवांचीं नांवं असून राक्षसाप्रमाणं कपटाचरण करण्यापेक्षां कडू भोंपळा नांव असून अमृताप्रमाणं भाषण करणं आम्ही अधिक श्रेष्ठ मानतों.

**इंद्र**—वा रे वा ! बरेच शहाणे आहांत. बरं, तुम्ही राहणार कुठले ?

**नारद**—सागरचे.

**ब्रह्मानंद**—सागरचे ? आणि इतके लांब एकटेच ? तुमचे आईबाप कुठं आहेत ?

**नारद**—स्वर्गात.

**इंद्र**—अरेरे ! इतक्या बालवयांत पोरकेपणा म्हणजे दुर्दैवच.

**ब्रह्मानंद**—त्यांचं दुर्दैव पण आमचं सुदैव. मुलगी छान देखणी आहे. अशी फाकडा नायकीण होईल कीं यंव्. ( उघड ) कायरे, तुमचे आईबाप स्वर्गाला जाऊन किती दिवस झाले ?

**नारद**—आम्हांला काय ठाऊक ? लोक म्हणतात कीं, ते फार दिवसांपासून स्वर्गस्थ आहेत.

**वरुण**—काय रे ! तुमचे दोघांचे आईबाप एकच का ? म्हणजे तुम्ही सख्खे बहीणभाऊ आहांत ना ?

**नारद**—आम्ही बहीणभाऊ आहोंत; पण आमचे आईबाप एक नाहींत.

**ब्रह्मानंद**—आईबाप एक नाहींत ? मग बहीणभाऊ कसे ?

**नारद**—आईबापांना सोडल्यापासून आम्ही एकमेकांना—

**ब्रह्मानंद**—काय वेडा आहे ! तुम्ही आईबापांना सोडलं कीं आईबापांनीं तुम्हांला सोडलं ?

**नारद**—कोणाला कोणीं सोडलं तरी एकच; पण तेव्हांपासून आम्ही एकमेकांनां बहीणभाऊ मानतों आहोंत.

**ब्रह्मानंद**—असं मानल्यानं कुठं बहीणभाऊ होतं? मला देखील इथल्या सर्व नायकिणी दादा म्हणतात, म्हणून त्या काय माझ्या साऱ्या बहिणी, कीं मी त्या साऱ्यांचा भाऊच? बरं, तुम्ही या गांवांत कां आलांत?

**नारद**—निर्वाहाकरितां.

**ब्रह्मानंद**—या मुलीचा निर्वाह मी चालवितों. तुझी दुसरीकडे सोय पाहा. ये मुली, माझ्या शेजारीं उभी रहा.

**नारद**—वाहवा! नको ग जाऊं, ताई. आम्ही एकमेकांना सोडून राहाणार नाहीं.

**इंद्र**—बरं तर. तुला मी संभाळतों आणि तिला हे संभाळतों म्हणतात. मग तर झालं?

**नारद**—माझ्या बहिणीला संभाळणारी कोणी स्त्री पाहिजे; ती पुरुषाजवळ नाहीं राहाणार.

**ब्रह्मानंद**—बरं तर, तुझ्या बहिणीला मी माझ्या बहिणीजवळ ठेवतों आणि तूं यांच्याजवळ रहा.

**नारद**—पण हे तरी नेहमीं राहणार कुठें?

**वरुण**—यांच्या बहिणीजवळ.

**नारद**—म्हणजे आपण सर्व जण यांच्या बहिणीजवळ राहायचं म्हणायचं? ठीक आहे. बरं, आम्हीं कामं काय करायचीं?

**ब्रह्मानंद**—इनं सकाळीं आमच्या घरीं घरकाम करायचं, संध्याकाळीं आमच्या गायनशाळेंत गायला–नाचायला शिकायचं आणि रात्रीं आमच्या घरीं आल्यागेल्यांना पानसुपारी द्यायची.

**नारद**—बरं, मीं काय करायचं?

**इंद्र**—तूं माझी सेवाचाकरी करायची; चला.

**नारद**—तुंबरूस्वामी, सांभाळा हो, आतां या. मृत्युलोकच्या उल्लू लोकांशीं प्रसंग आहे.

१४ पद —( दरुजन मैना रही. )

**परिजन झाले मुनि महाराज ॥ ध्रु० ॥ परिजन होती त्यजुनि विरक्ती ॥ घेती स्वहस्तीं सुरकाज ॥ १ ॥ तरुणि बनोनी वरिति मनांनीं ॥ शालू दुपेटा शिरताज ॥ २ ॥**

( सर्व जातात. )

---

## प्रवेश ३ रा

**स्थळ**—विश्वमोहिनीचा महाल.

[ मध्यें चौका मांडला आहे. सदानंदा पूजा करते आहे. रंभा, मेनका वगैरे नायकिणी एकेक चीज गात आहेत. इतक्यांत ब्रह्मानंद, इंद्र, नारद, वरुण, तुंबरू येतात. ]

१५ पद —( सारंग धुमाळी, काहे मन मारो. )

**इंद्र — स्मर भडिमार करी जरी तरुणा ॥ ध्रु० ॥ त्यागुनि आप्त वर्ग साध्विहि ललना ॥ शांत मनें साधी प्रियजन पूजना ॥ चाल ॥ हें कार्य कराया मज नच भीति कुणाची ॥ कीं आस नसे हो मज मुळिं इंद्रपदाची ॥ १ ॥**

**ब्रह्मानंद**—पुरंदरशेट, पाहिलंत का, आमच्या नंदिग्रामाचं सर्व वैभव एक ठिकाणीं एकत्र झालं आहे.

**इंद्र**—आम्ही आपलं सर्व वैभव आपल्याला अर्पण करण्याला तयार आहोंत. आतां हें तुमचं वैभव आमच्या पदरांत टाका म्हणजे झालं.

**ब्रह्मानंद**—जरा थांबा, सोईसोईनें सर्व व्यवस्था करतों. ( विश्वमोहिनीस ) आई, ते पहा, आपल्या महानंदेकरतां मालक आणले आहेत.

**विश्वमोहिनी**—महानंदेकरतां ?

**ब्रह्मानंद**—होय, तुझ्याकरतां नव्हे. लागेल तितकी संपत्ति देतों म्हणतात.

**विश्वमोहिनी**—ते देतों म्हणतील. पण पोरीच्या कुठं नशिबीं आहे? मला यजमान कर्तव्य नाहीं, असं ती साफ सांगते.

**ब्रह्मानंद**—बोधाच्या चार गोष्टी सांगून पाहा. असं घाऊक गिऱ्हाईक हातचं दवडायचं कीं काय?

**विश्वमोहिनी**—जंग जंग पछाडलं, 'पण रामाय च शिवाय च' ती कांहीं केल्या माझं ऐकत नाहीं. ब्रह्मानंदा, आतां याला तूंच कांहीं तरी तोड काढ.

**ब्रह्मानंद**—बरं तर, आतां असं कर. महानंदेला दडवून ठेवून सदानंदेला महानंदा कर. त्यांनीं कांहीं अजून तिला प्रत्यक्ष पाहिली नाहीं, कांहीं नाहीं.

**विश्वमोहिनी**—पण या सर्व आहेत ना?

**ब्रह्मानंद**—त्यांना आतां प्रसाद देऊन रवाना कर व महानंदेला तिच्या नर्तनशाळेंत एकांतांत राहायला सांग. ती पाहा तिच्यासाठीं नवीन दासी आणली आहे. तिची व तिची ओळख करून दे; म्हणजे आपाप आळी मिळी गोप चिळी होईल. (तुंबरूस) इकडे ये ग. इच्याबरोबर जा आणि ही काय काय सांगेल तें कर. (विश्वमोहिनी व तुंबरू जातात.)

**इंद्र**—आप्पतिशेट, या एकंदर जमलेल्या नायकिणींत महानंदा कोणती असावी बरं?

**वरुण**—जी सर्वांत सुंदर असेल ती.

**नारद**—धनीसाहेब, जी मोठा पांढरा शालू नेसली आहे ती महानंदा असावी. ती पहा कशी रुप्याच्या संपुष्टांत शालिग्राम ठेवल्यासारखी दिसते आहे.

**इंद्र**—मोठा शालू नेसली म्हणून अधिक सुंदर होत नाहीं. ती पहा, हरिणीप्रमाणें नेत्र, चाफेकळीप्रमाणें नाक आणि सर्वांत मधें बसलेली ती महानंदा असावी.

**नारद**—धनीसाहेब, पाणीदार डोळे आणि साधे डोळे, सरळ नाक व नकटं नाक यांत अधिक सुंदर कशावरून समजायचं?

**इंद्र**—अरे मूर्खा, सौंदर्य हें सरळ नाक व पाणीदार डोळे यांवरूनच अजमावयाचं असतं.

**नारद**—पण मी म्हणतों, गडव्यांतलं पाणी सुरईतील पाण्यापेक्षां कमी गोड असतं कीं काय?

**इंद्र**—नारळ्या, तूं अगदींच मूर्ख आहेस रे!

**नारद** —म्हणूनच आपला आश्रय केला.

**इंद्र** —म्हणजे माझ्या संगतीनं शहाणा होशील होय ?

**नारद** —किंवा आपण माझ्या संगतीनं व्हाल.

**विश्वमोहिनी** —(प्रवेश करून) बायांनो ! बाहेर कोणी दूरदेशचे धनाढ्य सद्‌गृहस्थ आले आहेत, तरी आतां हा समारंभ लवकर आटपता घ्या.

**रंभा** —मग त्यांना आंत येण्याची आमची कांहीं मनाई नाहीं. इथं आम्ही सर्व नायकिणीच आहोंत.

**ब्रह्मानंद** —पण ते आहेत गरती पुरुष, त्यांना तुमचा संसर्ग नको असेल तर ?

**मेनका** —मग आमचाही कांहीं आग्रह नाहीं. म्हणे गरती पुरुष. मग नायकिणीच्या घरीं कशाला आले ?

**विश्वमोहिनी** —बरं, तुम्ही आतां महानंदेला चांगलासा आशीर्वाद देऊन पानसुपारी घेऊन हा समारंभ आटपा बरं. ( पानसुपारी, अत्तरगुलाब देतात. )

१६ **पद** —( भीमपलास-दादरा, आवो पीवो पि. )

**वारांगना — महानंदे, तूं नांदे जगीं सर्व काल आनंदें ॥ नृत्य गानाभिनयीं विशारदे ॥ धृ० ॥ जेंवि रतिच खरी सुमंदिरीं सतत विहारी ॥ जाशि नृपराजकुमारी ॥ जणुं मृगराजकिशोरी ॥ युवहृदयास विदारी ॥ नाचत नाचत अशि ठुमकत सदन भरित सौगंधें ॥ १ ॥**

( सर्व नायकिणी जातात. )

**ब्रह्मानंद** —या शेटजी, गादीवर बसा, विडा घ्या.

**नारद** —मी कुठं बसूं धनीसाहेब ?

**विश्वमोहिनी** —हा कोण, शेटजीचा नोकर आहे वाटतं ? तुझं नांव काय मुला ?

**नारद** —माझं नांव नारळ्या. कुठं बसूं ?

**ब्रह्मानंद** —तिकडं देवडीवर आमच्या भोंपळ्याजवळ बैस जा.

**नारद** —मी जाऊं होय धनीसाहेब ?

**इंद्र** —जा, बैस तिकडं. मी हांक मारीन तेव्हां ये.

**नारद** —( जातां जातां ब्रह्मानंदास ) काय हो सभ्य मध्यस्थ, आमच्या धनीसाहेबांना महानंदा पाहिजे ; आणि तुम्ही तर त्यांना सदानंदा देत आहां. द्या, द्या ; घाबरूं नका. मी कांहीं धनीसाहेबांना सांगणार नाहीं. [ जातो. ]

**ब्रह्मानंद** —काय पोर धोरणी आहे हो ! बरं, त्याची समजूत मग करूं.

**विश्वमोहिनी** —मुली ! पाहुण्यांना पट्टी करून दे बरं.

**ब्रह्मानंद** —पुरंदरशेट, ही महानंदा व हे तुम्ही. आतां आमची रक्कम ?

**इंद्र** —ठीक आहे. आप्पातिशेट, यांच्याबरोबर पेढीवर जा आणि यांच्या इच्छेला येईल तितकी रक्कम यांच्या स्वाधीन करा. आणखी हें पहा ( हळूच ) वरुणा, आतां तुला परत येण्याचें प्रयोजन नाहीं. यांची रक्कम पटीव व गांवाबाहेर जाऊन नदीमध्यें या पंचभूतात्मक देहाचा त्याग कर आणि स्वर्गलोकीं जा. मी महानंदेला घेऊन मागोमाग आलोंच.

**वरुण** —देवेंद्रा ! इतक्या अल्प श्रमांत महानंदा प्राप्त झाली याविषयीं मला जरा संशय येतो. नारदांनीं तर हिची फार प्रशंसा केली होती.

**इंद्र** —अरे, खऱ्या गुणापेक्षां प्रशंसेनंच एखाद्या व्यक्तीला जास्त महत्त्व येतं. परंतु स्त्रीवशीकरणाची सामुग्री संन्याशापेक्षां गृहस्थाजवळ किती तरी पटीनं अधिक असते हें नारदाला काय ठाऊक ? जा बेलाशक, संशय वगैरे कांहीं नाहीं.

( ब्रह्मानंद व वरुण जातात. )

**विश्वमोहिनी** —शेटजी, आमचं घराणं गणिकेचं खरं, पण फार अस्सल प्रतीचं आहे हो.

**इंद्र** — तें काय सांगावं ! मला का माहीत नाहीं ?

**विश्वमोहिनी** —आणि त्यांत ही माझी मुलगी इतकी गुणाची आहे कीं, हिच्यासाठीं स्वर्गांतल्या इंद्रानंदेखील आपल्या बायकोला खुशाल सोडचिठ्ठी द्यावी.

**इंद्र** —आणि म्हणूनच मी आपल्या सर्वस्वावर तुळशीपत्र ठेवून महानंदेचं नांव ऐकून, इतक्या लांब चालत आलों.

**विश्वमोहिनी** —मुली ! शेटजी भले मनुष्य दिसतात. विड्यांत वेलदोडा घाल बरं ! एकूण आपण महानंदा या नांवावर लुब्ध आहांत तर !

**इंद्र**— छे; छे ; आतां प्रत्यक्ष स्वरूप पाहिल्यावर नांवांत काय महत्त्व राहिलं ?

**विश्वमोहिनी** —आपण हिच्यासाठीं आपली सर्व संपत्ति आम्हांला अर्पण केली ना ?

**इंद्र** —होय, हिच्यासाठीं.

**विश्वमोहिनी** —अग, जरासं जायफळही पण घाल. आतां उभयपक्षीं कांहीं शंका-तक्रार नाहीं ?

**इंद्र**—कांहीं नाहीं. कां? फार खोदूनसं विचारतां?

**विश्वमोहिनी**—आमचं विश्वयोषितांचं घर म्हणजे कापट्याचा बाजार असा सर्वांचा समज असतो. काय म्हणे, दाखवायला एक आणि प्रसंग पडतो भलतीशींच.

**इंद्र**—असं म्हणणारे बेटे आंधळे असले पाहिजेत.

**विश्वमोहिनी**—अहो, काय विचारतां! परवां त्या रंभेच्या घरीं असेच एक सोकाजी आले आणि तिच्या कुणबिणीलाच रंभा म्हणूं लागले. तसं तुम्ही उद्यां मलाच महानंदा म्हणूं लागलां तर?

**इंद्र**—तुम्हांला मी महानंदा म्हणेन असं स्वप्नांतदेखील आणूं नका.

**विश्वमोहिनी**—( सदानंदेस हळूच ) मुली, आमच्या भाषणावरून तुझ्या सर्व ध्यानांत आलंच असेल.

**सदानंदा**—हो. मी महानंदा म्हणून यांच्याशीं वागायचं ना?

**विश्वमोहिनी**—( तिला कुरवाळून ) माझी बाळ कशी गुणाची आहे! लोक म्हणतात औरस संतति आईबापाला म्हातारपणीं सुख देते. पण आमच्या वेश्यांच्या दत्तक मुलीच हजार पटींनं चांगल्या. बिचाऱ्या सांगावं तसं ऐकतात. बये, मीं शिकवलं आहे, तसं यांच्याशीं बोल बरं!

**सदानंदा**—अगदीं तस्सं बोलेन; मुळीं चुकायची नाहीं.

**विश्वमोहिनी**—म्हणावं मला आजपर्यंत सारखीं तुमचीं स्वप्नं पडत होतीं.

**सदानंदा**—तें तर अगोदर म्हणेन.

**विश्वमोहिनी**—आणि म्हणावं, तुम्ही अगदीं मदनाप्रमाणं सुस्वरूप आणि कुबेराप्रमाणं श्रीमंत आहांत.

**सदानंदा**—तसं म्हटल्यावांचून ते मला सुंदर कशी म्हणतील?

**विश्वमोहिनी**—होय. पण तसं म्हणून ते तुला जवळ जवळ ओढूं लागतील.

**सदानंदा**—पण मी बरी जाईन? अश्शी आळेपिळे देत राहीन.

**विश्वमोहिनी**—अस्सं; आणि फारच लगट करूं लागले म्हणजे आपल्या घरांत केरसुणीपासून सर्व जिनसांची वाण आहे, असं रडगाणं गात बसावं.

**सदानंदा**—तीच तर वेळ काय तें मिळवायची. ती मी कशी विसरेन ?

**विश्वमोहिनी**—मग तूं जें जें मागशील तें तें उद्यां आणून देतों म्हणतील कीं आपण लागलीच त्यांच्याकडून वाडवडिलांची शपथ घेववावी. प्रत्येक वचनागणीक शपथ घेववावी.

**सदानंदा**—बरं, त्यांनीं मला विचारलं कीं, "तुझं माझ्यावर खरं प्रेम आहे का ?" तर कसं सांगायचं ग, आई ?

**विश्वमोहिनी**—हा वेडे ! इतक्यांत विसरलीस ? तसं विचारलं कीं लागलींच आपण शपथ घेऊन सांगावं कीं, तुमच्यावांचून या जगत्रयांतील पुरुष मला बापाभावाप्रमाणं आहेत.

**सदानंदा**—अशी तुझ्या गळ्याची मी खोटी शपथ वाहूं ?

**विश्वमोहिनी**—अग, आपण शपथा वाहायच्या त्या आपल्या आई-बापांच्या वाहूं नयेत. त्यांच्याच गळ्याच्या वाहाव्यात.

**सदानंदा**—पण तशा तरी खोट्या शपथा वाहिल्याचं पाप—

**विश्वमोहिनी**—हो, तुला मुद्याचं सांगायचं राहिलंच. बोलतांना नेहमीं लुगड्याचं टोंक तोंडांत चघळीत चघळीत बोलावं ; म्हणजे कितीही खोट्या शपथा वाहिल्या तरी तोंडांत सूत असल्यामुळं पाप लागत नाहीं. बरं मी जातें. तो ब्रह्मानंद रक्कम घेऊन आला. बरं, हा घे विडा आणि पलंगावर बसतांना त्यांना दे बरं.

(विश्वमोहिनी जाते.)

**इंद्र**—वृद्ध माणसं निघून गेलीं. आतां लाजून दूर कशासाठीं उभं रहायचं ? दोघांनीं एका आसनावर बसायला कांहीं हरकत नाहीं. स्त्रियांची जात हट्टी खरी, आम्ही आपल्यासाठीं चार दिवसांचा रस्ता चालत आलों आणि आपण आमच्याकरतां चार पावलंदेखील आपल्या मनानं टाकूं नयेत ना ?

**सदानंदा**—आपण महानंदा या नांवावर आलांत—माझ्याकरितां नव्हे.

**इंद्र**—बरं, आपल्या जाग्यावर बसून एक सुरेखशी पट्टी करा पाहूं.

**नारद**—(प्रवेश करून) वाहवा ! काय रंग जमला आहे पण—

१७ पद्—( भामदिया दिल भरिया. )

**रंग नवा बहु बरवा खुलत मनिं मधवा बहुताचि ॥ स्त्री-संग दंग नर करि ॥ध्रु०॥ दुग्ध पिपासा शक्र शमन करि तक्रचि प्राशुन ॥ १ ॥ या रंगाचा बदरंग करिन इंगित सांगुन ॥ २ ॥ अनंग नव रति भंग उतरविन संगि न सोडुन ॥ ३ ॥**

**सदानंदा**—( विडा देत ) खरंच गडे, आज किती दिवस तरी मी आपली चातक पक्ष्याप्रमाणं मार्गप्रतिक्षा करीत आहें.

**इंद्र**—काय म्हणतां ? अगदीं चातक पक्ष्याप्रमाणं ?

**नारद**—( स्वगत ) होय हो, पण गृध्र पक्ष्याप्रमाणं. केव्हां येतां आणि केव्हां लचके तोडनें.

**इंद्र**—बरं. पण तुम्हांला माझं नांव काय नाहीत ?

**नारद**—( स्वगत ) आणि अजून तरी कुठं माहीत आहे ?

**सदानंदा**—आम्ही आपल्यासारखे दुसऱ्याच्या नांवावर प्रेम करीत नाहीं. प्रत्यक्ष मनुष्य पाहून करतों.

**इंद्र**—म्हणजे ? पूर्वी मला कधीं पाहिलं होतं ?

**नारद**—( स्वगत ) होय, कल्पनासृष्टींत.

**इंद्र**—मी तर या मुलुखांत आजच आलों.

**सदानंदा**—असाल; पण मी आपली आज सहा महिने मार्गप्रतीक्षा करतें आहें.

**इंद्र**—म्हणजे मी याचा अर्थ नाहीं समजलों.

**नारद**—( स्वगत ) ज्यांत कांहीं अर्थच नाहीं त्यांत समजणार काय ?

**इंद्र**—आपल्याला माझ्याविषयीं कुणीं सांगितलं ?

**सदानंदा**—आम्हांला कुणीं नाहीं सांगावं लागत. आमचा आपला स्वप्नांवर जास्त भरंवसा आहे.

**नारद**—( स्वगत ) हो. कारण आपल्याला तीं वाटतील तशीं पाहून घ्यायला येतात.

**इंद्र**—आपल्याला माझ्याविषयीं काहीं स्वप्न पडलं ? तें काय ?

**सदानंदा**—एके दिवशीं रात्रीं मीं नित्य नियमाप्रमाणं रुक्मिणीस्वयंवर वाचलं.

**नारद** —( स्वगत ) रोजचं नवं स्वयंवर टाकून तें शिळं रुक्मिणीस्वयंवर कशाला वाचलं ?

**इंद्र** —एकूण आपण बऱ्याच देवभोळ्या आहांत.

**नारद** —( स्वगत ) म्हणजे देवाला भोळा बनविणाऱ्या.

**सदानंदा** —तरी झोंप येईना ; म्हणून उषास्वप्न वाचूं लागलें, तों तशीच झोंप लागली.

**इंद्र** —आणि मग ?

**नारद** —( स्वगत ) आणि त्या बिचाऱ्या उषेचं स्वप्न यांना पडूं लागलं.

**सदानंदा** —मला प्रथम असा भास झाला कीं, रुक्मिणीनं श्रीकृष्णाच्या प्राप्तीकरतां जशी सुदेवाची प्रार्थना केली, तशी मी कुणा प्रियकराच्या प्राप्तीकरतां एका बालमुनीची मनधरणी करीत आहें.

**नारद** —( स्वगत ) या रुक्मिणी, हे श्रीकृष्ण आणि आम्ही सुदेवभटजी असं दिसतं.

**इंद्र** —वाहवा ! मग ?

**सदानंदा** —त्या बालमुनींनीं मला आश्वासन देऊन इंद्रपुरीप्रमाणं एका मोठ्या नगरींतील राजसभेंत नेऊन तेथील राजासमोर उभी केली आणि " हा पहा तुझा प्रियकर " असं सांगितलं.

**नारद** —( स्वगत ) हेच ते राजेश्री.

**इंद्र** —तो राजा कोण होता बरं ?

**सदानंदा** —दुसरा कोण ? आपणच आणि तेव्हांपासूनच मला आपलं सारखं वेड लागलं आहे.

**इंद्र** —जें जें ऐकावं तें तें आश्चर्यच.

**नारद** —( स्वगत ) आश्चर्य कसलं ? नायकिणींना आपल्या यजमानांचीं अशींच नेहमीं खोटीं स्वप्नं पडत असतात ; पण त्यांना वेड लागतं तें मात्र पैशाचं—यजमानांचं नव्हे.

**इंद्र** —बरं, वेड लागल्यासारखे तुझे हेतु तर पूर्ण झाले ?

**नारद** —( स्वगत ) पण तुमचे हेतु अपूर्ण राहून तुम्हांला मात्र वेड लागणार.

**इंद्र** —अहाहा ! तूं अशी अधोवदन करून उभी राहिलीस म्हणजे मला असं वाटतं—

१८ पद — ( पानि भरेली कोन. )

**सर्व कलांनीं । पूर्ण शशिबिंब हें काय मनोरम ॥धृ०॥ रंभा द्वयावरि । हेमकलशांतरिं । अमृतरसाचा । स्राव कराया । बघतें हें काय ॥ १ ॥**

बरं, चल; रात्र फार झाली. ( इंद्र व सदानंदा जातात. )

**नारद**—ही जगत्रयाच्या पातकांची खाण अधोवदन करून उभी राहिली म्हणजे काय भास होतो ? पौर्णिमेचा चंद्रमा केळीच्या गाभ्यावर ठेवलेल्या सुवर्ण कलशांत अमृतस्राव करतो आहे कीं काय ? वाः ! लाला, दूषिका, श्लेष्मादिकांनी डबडबलेल्या स्त्रियांच्या मुखाला हे विषयलंपट लोक कशाची उपमा देतील आणि या हाडामांसाच्या पुतळ्यांना किती प्रकारांनी वाखाणतील याचा कांहीं नियम नाहीं.

१९ पद — ( सारंग—धुमाळी )

**पहा कैसें रसिक कवी स्त्रीचें स्वरूप किती वानिती ॥ धृ० ॥ मुखा चंद्र समजती ॥ स्तनीं मांसग्रंथि ती ॥ कनक कलश उपमिती ॥ रक्ताचें अमृत बनविती नुमजती जल्पती तरि किती ॥ चाल ॥ जें स्रवत सदा मलमूत्र तें जघन दर्शवितें ॥ हस्तीच्या शुंडेतें कीं रंभास्तंभातें ॥ योग्य नसोनि तें ॥ सुजन कुजन उगि बडबडती नुमजती जल्पती तरि किती ॥ १ ॥**

---

## प्रवेश ४ था

[ ट्रॅन्स्फर सीन — महिलांचें क्रीडोद्यान. महानंदा व तुंबरू. ]

**तुंबरू**—ताईसाहेब, आमच्यासारख्या पोरक्या प्राण्यांनीं दुःखी असणं एकपरी शोभेल; पण आपल्यासारख्या सर्वैश्वर्ययुक्त माणसांनीं दुःखी असणं चमत्कारिक दिसतं.

**महानंदा**—अग, तूं लहान आहेस. तुला जगाचा अनुभव नाहीं म्हणून असं म्हणतेस.

२० पद —( परदेशी सैंया नेह लगायो. )

**सखि, या संसारीं। वेश्या जनातें सुख कोणतें ॥ तुज वाटतें ॥ मज नेणते ॥ धृ० ॥ बाह्यांगीं ढंग मोठा ॥ अंतरिंचा रंग खोटा ॥ कपटानृतधच परिपाठा ॥ धनार्थ वसवस ॥ परार्थ धुसफुस ॥ चालते ॥ हरि शांतितें ॥ वरि खंतितें ॥ १ ॥ कवणावरि प्रेम करावें ॥ कवणा नयनीं खुणवावें ॥ कवणातें रतिसुख द्यावें ॥ कवणावर ती न खरी प्रीति ॥ बोलते ॥ तशि चालते ॥ न कधींच ते ॥ २ ॥**

**तुंबरू**—ताईसाहेब, ज्यांच्या घरीं बिछान्याऐवजीं चटई, समईऐवजीं पणती आणि शालूऐवजीं जगन्नाथी अशी जैनी—पणती—जगन्नाथी स्थिति असेल, त्यांना खोटींनाटीं कर्मे करावीं लागत असतील. आपल्याला तसं करण्याचं कारण नाहीं. कारण आपल्याला द्रव्यबल विपुल आहे, तसं आईबाप, बहीण-भाऊ यांचं मनुष्यबलही आहे. मग दुःख कशाचं ?

**महानंदा**—आईबाप ? आमचे वेश्यांचे आईबाप म्हणजे एखाद्या सुपीक जमिनीचे मिराशी हक्क सांगणारे शेतकरी. ते जसे तिच्यांतील कांटेकुटे, दगड-गोटे काढून तिला साफ करण्याकरितां कुळवतात, तसे हे आमचं अंग तुळ-तुळीत दिसावं म्हणून न्हाऊंधुऊं लागतात. ते नदी-विहिरीचं पाणी घालून तिला पोसतात, तसे हे आम्हांला तूपदूध पाजून वाढवितात. ते तिच्यांत जास्त उत्पन्न यावं म्हणून खत घालतात, तसे हे आम्हांला जास्त भाव यावा म्हणून दागिने घालतात आणि ते जसे सालांतून एकदां, दोनदां, तीनदां निघतील तितकीं तिच्यांतून पिकं काढून घेऊन लवकरच निस्सत्त्व करून टाकतात, तसे आमचे आईबाप आमच्या एकटीकडून एकाच दिवशीं ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र या चारी वर्णांच्या यजमानांची सेवा करवितात आणि आम्हांला अल्प काळांतच वृद्धत्व आणतात. मग कशाचे आईबाप ? नुसते नांवाचेच ना ?

२१ पद —( कहियो जसोदासे जायरे. )

**सकल वचें जन आमुचे अखेरिचें नाहीं कोणी कुणाचें ॥ धृ० ॥**
**पोटीं वाही ॥ जननि ना येते ही ॥ दुःख हराया स्मशानिंचें ॥ १ ॥**
**तातानेंही ॥ फिरवियेलें देहीं ॥ पाश हरि न यम हातिंचे ॥ २ ॥**
**बंधूभगिनी ॥ दुरुनि पाहाति नयनीं ॥ बसति चटके जंव वन्हिचे ॥ ३ ॥**
**एकें येणें एकलियानें जाणें ॥ फिरत भंवरे भवसिंधुचे ॥ ४ ॥**

**तुंबरू**—खरंच ताईसाहेब, आपलं म्हणणं खरं आहे आणि म्हणूनच जगांत पतिपत्नी, पितापुत्र, गुरुशिष्य, राजाप्रजा हीं जीं एकमेकांवर प्रेम करतात, तें दुसऱ्याच्या कल्याणाकरतां नसून त्यांचं त्यांनाच सुख होण्याकरितां असतं.

**महानंदा**—अस्सं; कसं आतां अगदीं बरोबर बोललीस आणि म्हणूनच या जगाला देवाणघेवाणाचा बाजार म्हणतात तें कां उगीच? आणि तो बाजार तरी खरा कुठला?

२२ **पद**—( सारंग—केरवा. )

**मायेचा सारा बाजार ॥ हा गे ॥ मृगजलवतची संसार ॥ धृ० ॥ नाना जाति विहंगम जमती। तरुवरतीं सुदिनांतीं ॥ परि प्रभातीं उडोनि जाती। कधिं नच येति समोर ॥ १ ॥ जनक जननि बंधू आणि भगिनी अशि सदना सदनांनीं ॥ सदसत्कृतिचे शिरिं भार घेउनि अंतिं सर्व जाणार ॥ २ ॥ भयकारक भवहारक तारक मारक दुष्ट-जनांचा ॥ जगचालक प्रतिपालक मालक तोचि एक उरणार ॥ ३ ॥**

**विश्वमोहिनी**—( प्रवेश करून ) हा मेल्यांनो! शर्थ झाली बाई तुझ्यापुढं.

**महानंदा**—काय झालं, आईसाहेब?

**विश्वमोहिनी**—डोंबल झालं. अग, अशा गुजरीच्या वेळीं आपल्या घरीं कुणी चरा येतो, कुणी बुरा येतो, कुणी गाणं करा म्हणतो, कुणी कांहीं म्हणतो. तर या वेळी तंबोरा घेऊन घरांत बसायचं, कीं बागेंत ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगावयाच्या?

**महानंदा**—घरांत अक्कासाहेब आहेत तर खऱ्या, त्या आणि तुम्ही आपली गुजरीची वेळ वाटेल त्या तऱ्हेनं गुजरतां आहांतच. मग मीच कशाला?

**विश्वमोहिनी**—महानंदे, जेव्हां मी तुझ्याजवळ आपल्या धंद्यासंबंधानं गोष्ट काढतें, तेव्हां तूं अशीच उडवाउडवीचीं उत्तरं देतेस. तेव्हां तुझ्या मनांत आहे तरी काय? आपलं कुळ बुडवायचं का आहे तुला?

**महानंदा**—छे, हो. तें अधिक उदयाला आणायचं आहे.

२३ पद—( पूर्वी — त्रिवट — नादर दर दीम )

**प्रिय जनानि कां निराश होतां। चिताग्नीमधिं व्यर्थ काय कां। धड धड धड धड धड धड धड धड पेट घेत वरवर ॥ धृ० ॥ हरघृत व्यंकट कालकूट संपूर्त वाटतो। महा बलाहक गड गड गड गड गड गड गड गड कोसळे भयंकर ॥ १ ॥ हर हर हर जननी कामना न पूर्ण कां कसें कथाल कारण गेल्यावर वर सुरवर भुवनीं कराल काय वराल काय तराल काय ॥ २ ॥ आत्मारामीं रमा तरा भव। तो तरी करील दुंदुभीरध घड घड घड घड घड घड घड घड गर्जवी दिगंतर ॥ ३ ॥**

**विश्वमोहिनी**—अशी कर्तीसवर्ती झालेली लेक जर धंदा सोडून पोरीटोरीसारखी चकाव्या पिटून वेळ घालवूं लागली, तर निराश नको होऊं तर काय करूं ?

**महानंदा**—खरंच तें, देहाचं वृद्धत्व तें आशेचं तारुण्य !

**विश्वमोहिनी**—आतां मला कशाची आशा ! मी रडतें तुझ्या सुखासाठीं.

**महानंदा**—सुखदुःख हें मानण्यावर आहे.

**विश्वमोहिनी**—मोठी मेली वेन्दाती ! अग, अंगीं सर्व गुण यथास्थित असून मनुष्य जर त्यांचा दुरुपयोग करूं लागला तर लोक जशीं त्याला नांवें ठेवतात तशीं उद्यां तुला ठेवतील.

**महानंदा**—आई, जन आहे दुतोंडं. तें हवं तें म्हणेल; म्हणून आपण आपला विचार केला पाहिजे. घरांत सर्व गोष्टींची अनुकूलता असतां, मीं आपल्या घरीं येणाऱ्या-जाणाऱ्या द्रव्यांध व कामांध लोकांपुढें आपल्या स्वरूपाचं प्रदर्शन करीत कां बसावं ? स्त्रियांचं सौंदर्य विनयाच्या पड्याआड असेल तरच त्याला शोभा व किंमत; पण तेंच जर चव्हाट्यावर ठेवलं तर त्याच्याकडे मनुष्यच काय, पण पशूदेखील ढुंकून पाहणार नाहीं.

२४ पद—( सखेरी मैका पिया बिन. )

**असे कां स्त्रीचा हा जड देह तसा ॥ धृ० ॥ नगर चतुष्पथिं स्थापन केला मुख पाहण्या आरसा ॥ १ ॥ अहिशिरिंचा मणि भंगुनि गेला जडविल कोण कसा ॥ २ ॥**

**विश्वमोहिनी**—अग खुळे, तुझ्यासारख्या तारुण्यानं मुसमुसलेल्या, गायननर्तनादि गुणांनीं नटलेल्या वेश्यांनीं आपलं स्वरूप कामानं अंध झालेल्या लोकांच्या उपयोगी पडूं दिलं नाहीं, तर तें कामानं सोडलेल्या अशांच्या का गळ्यांत बांधायचं ?

**महानंदा**—तें कामानं अंध झालेल्या किंवा कामानं सोडलेल्या या दोघांहीकरतां नसून, ज्यानं कामाला जाळून भस्म केला त्याच्याकरतां आहे; समजलीस ?

**विश्वमोहिनी**—तुला जों जों होय म्हणावं, तों तों तूं अधिकच वेदान्त सांगायला लागलीस ! थांब, उद्यां तुझ्या पोटोबाला एकादशी घालतें, मग तुझी विठोबाची पंचविशी ऐकतें. (रागारागानं निघून जाते.)

**तुंबरू**—ताईसाहेब, जन्म कोणत्याही कुळांत झाला म्हणून आपण कशासाठीं वाईट वाटून घ्यायचं ? तो दोष, जन्म देणारांचा घेणाराकडे कांहीं नाहीं. अगदीं नीच कुलांत उत्पन्न होऊन, उच्चकुलोत्पन्न लोकांनाही लाजविण्यासारखीं सत्कृत्यं करून, ज्यांनीं आपल्या जन्माचं सार्थक केलं अशा लोकांचीं पुराणांत किती तरी नांवं सांपडतील. वारांगनेच्या जन्माला येऊन कुलस्त्रियेलाही खालीं पहावं लागेल असं वागायला येतं.

**महानंदा**—तें कसं ?

**तुंबरू**—कुलस्त्रिया पतीला दैवत समजून त्याची जशी कायावाचामनें-करून पूजा करतात, तशी वारयोषितेनं आपल्या यजमानाची करावी म्हणजे झालं.

**महानंदा**—अग, पण जर नित्य नव्या देवाची पूजा करण्याचा प्रसंग येऊं लागला तर त्या भक्तिणीचं मन एकाग्रता तरी कसं पावेल ? आणि मनाच्या एकाग्रतेशिवाय कोणाचंहि अंतिम ध्येय कधींच साध्य होत नाहीं. आज मारुतीच्या पूजेला जर शुभ्र पुष्पं आणिलीं तर उद्यां गणपतीच्या पूजेला तांबडीं आणलीं पाहिजेत. आराध्यदेवतांच्या पूजेकरतां आणायच्या बाह्य सुमनांचा जर रोज असा नवा रंग होणार, तर अंतर्यामींच्या सुमनाचा रंग कायम कसा टिकणार ? या कामिनीलतेचं सुमन परप्रकाश आहे. ती ज्या वृक्षाचा आश्रय करून राहील त्या वृक्षाच्या सुमनाचा रंग इच्या सुमनाच्या ठिकाणीं प्राप्त होणार. आज गोपाळ दैवत लाभलं, तर तें बोधामृत पाजून ही काया शांत करील आणि उद्यां

कलिदैवत घरांत घुसलं तर तें कापट्यसुरा प्राशन करायला लावून ही तनु भ्रष्ट करील.

**तुंबरू** — त्याला मी एक युक्ति सांगतें.

**महानंदा** — ती काय?

**तुंबरू** — जो पृथ्वीच्या मोलाचं कंकण देईल तोच यजमान करायचा असा आपण पण लावा.

**महानंदा** — म्हणजे काय होईल?

**तुंबरू** —आपली मुलगी कुलाचाराप्रमाणं वागायला तयार झाली असं पाहून मातोश्रींना आनंद वाटेल आणि अनेक पुरुषांचा स्नेह होण्याची आपली भीति तुटेल.

**महानंदा** — पण असा पृथ्वीच्या मोलाचं कंकण देणारा कोण सांपडणार?

**तुंबरू** — कां नाहीं सांपडणार? ताईसाहेब, आपली योग्यता कांहीं कमी नाहीं. अशा हजारों बहुरत्ना वसुंधरा आपल्या पासंगालाही पुरणार नाहींत. तेव्हां अशा या रत्नाला अंकावर धारण करण्याची इच्छा करून येणारा तशा असंख्य रत्नाकरांचा मालकच असला पाहिजे.

**महानंदा** — खरं ग खरं. पूर्वीच्या सत्त्वधीर माणसांचीं सत्त्वं हरण करण्यास येणारे त्यांचे आराध्य देवच होते. आजपासून तुझ्या उपदेशाप्रमाणंच वागायचं. सखे, आजपासून तूं माझी दासी नव्हेस, तर आपण एकाच मातेच्या उदरीं जन्मलेल्या अगदीं सख्ख्या बहिणी आहोंत, असं उभयतांनीं समजायचं बरं!

**२५ पद** — ( एरानासामी विनरा )

**हा प्रेमा पावेना विरामा ॥ जंवर ही तनु मम जिवंत वरिन अंत करिन खंत तंव ॥ ध्रु० ॥ वागुनि परस्परहि बहिणी ॥ मन सुखी करूं निशिदिनीं ॥ हितगुजहि कळवुं स्वमनीं ॥ अभिमान तो त्यजोनी ॥ १ ॥**

**तुंबरू**—हे जगज्जननी, आदिशक्ति, आदिमाये, दाक्षायणी, महाकालाच्या शापानं भ्रांत चित्त झाल्यामुळं बुडत्या माणसानं जसा दूर्वांकुराचा आश्रय मागावा, तसा तूं या दासाला हा मान देत आहेस. मीही त्याचा स्वीकार करून तुला अभिवचन देतों कीं—

२६ पद—(भैरवी-त्रिवट)

हा दिनरजनीं तव भजनीं निवसुनि तुज मानिं भगिनीसमान मानोनिया सुखकरिं करविल श्रम परिहरविल असुख न उरविल मन रमविल शमविल सकल अरि महान धरिल न मान ॥ ध्रु० ॥ उद्यम नुरविल श्रम सरविल भ्रम न करविल भगवान रतिकमले-सम विमले तव अबले गुणशीले स्वबल हवन करिल अवन तव कमल समान ॥ १ ॥ (जाते.)

## अंक १ ला समाप्त

---

# अंक २ रा



## प्रवेश १ ला

**स्थळ**—रस्ता ; पात्रें—नारद, तुंबरू व ब्रह्मानंद.

**नारद्**—आमचे यजमान पुरंदरशेट ऊर्फ देवेंद्रमहाराज स्वर्गांत आमच्याशीं पैज मारून महानंदेला वश करण्याकरतां आले ते सदानंदेवरच अनुरक्त झाले; परंतु ही कृत्रिम महानंदा तरी त्यांना वश झाली किंवा नाहीं, याविषयीं संशयच आहे. कारण त्यांच्या मुखश्रीवर जयाचीं कांहीं एक चिन्हं न दिसतां रोज अंगावरील एकेक अलंकार मात्र कमी होत चालला आहे. त्यांचे सर्व अलंकार आतां जेव्हां संपतील तेव्हां हा भ्रमाचा भोंवळा फुटणार असं वाटतं. एकूण आमची कामगिरी तर कांहीं एक खटपट न करतां सिद्धीस जात आहे. आतां तुंबरूस्वामीची खटपट कुठपर्यंत गेली आहे त्याची चौकशी करूं या. ( सारंगी घेऊन तुंबरू येतो. ) ओ हो हो ? कोण, तुंबरूस्वामी ? मला भास झाला कीं, आमची भगिनी सरस्वती सत्यलोकीं तातांचं मन रमविण्याकरतां, सतार वाजवावी म्हणून जात आहे; पण पहातों तों आमच्या तुंबाजी ब्रह्मानंदाच्या गायनशाळेंत सारंगी वाजवायला चालल्या आहेत.

**तुंबरू**—म्हणजे मी कांहीं तिथं सारंगी वाजवीत नाहीं.

**नारद्**—मग काय ? डग्गा-तबला ?

**तुंबरू**—मी स्वतः कांहींच वाजवीत नाहीं. कोण काय आणि कसं वाजवितात यांच्यावर देखरेख करतों.

**नारद्**—अस्सं, एकूण तुम्ही महामहोपाध्यक्षांच्या हाताखालच्या उपशिक्षक ? बरं, तुमच्या कामाचं काय झालं ?

**तुंबरू**—आदिशक्तीला असा गुरुमंत्र दिला आहे कीं, जो पृथ्वीच्या मोलाचं कंकण देईल तोच यजमान पत्करायचा.

**नारद्**—मग त्यांत काय आहे ? आमचे पुरंदरशेट तसलीं हवीं तितकीं कंकणं देतील.

**तुंबरू** — देतील; पण त्यांना ही खरी महानंदा व तिचा पण समजेल तेव्हां.

**नारद** — तें केव्हां समजणार?

**तुंबरू** — त्यांचं सर्व आहे-नाहीं तें या कृत्रिम महानंदेच्या पदरांत पडल्यावर.

**नारद** — मग समजून ते काय करणार?

**तुंबरू** — वारांगना आपल्या दरिद्री झालेल्या यजमानाला जें करतात तें. म्हणजे अर्धचंद्र अथवा अलकट पालकट घालून गटारास्तृप्यन्तु!

**नारद** — वाहवा! छान, छान. स्वर्गलोकीं अमृत पिऊन बेचव झालेल्या जिव्हेला, मृत्युलोकच्या गटारोदकानं प्रक्षालन केलं म्हणजे अधिक रुचि येईल खरी.

**तुंबरू** — बरं, आतां इथं माझं काय काम राहिलं?

**नारद** — आतां यापुढं तर तुमचंच काम आहे.

**तुंबरू** — तें काय?

**नारद** — (त्याचे कानांत सांगतो. इतक्यांत ब्रह्मानंद येतो.)

**ब्रह्मानंद** — तरी मला वाटलंच होतं कीं, या छेलछबेली आणि या चव-चाल पोरांत कांहीं तरी काळंबेरं असावं. हें मीं प्रथमच आईला सांगितलं, पण ती म्हणाली कीं, तीं लहान अर्भकं आहेत, त्यांना काय समजतं? भोळी बिचारी. तिला काय ठाऊक कीं, कलियुगांत अर्भकं हीं भातुकलीपासूनच सर्व व्यवहारज्ञान प्राप्त करून घेत असतात म्हणून! यांना आतां अशींच्या अशींच आईपुढं फरपटीत नेऊं का? पण नको. हे म्हणतील कीं, आम्ही राजाराणीच्या वरातीचा बेत करीत होतों. तेव्हां प्रथम ते काय कुजबुजतात तें स्पष्ट ऐकून नंतर त्याप्रमाणं करूं.

**तुंबरू** — आपण सांगतां, तर रहायला हरकत नाहीं; पण —

**नारद** — पण काय? आपल्याला महानंदेपासून कांहीं त्रास होतो?

**तुंबरू** — छे — छे, महानंदेपासून नाहीं; पण तिच्या त्या टोणग्या भावा-पासून होतो.

**ब्रह्मानंद** — (स्वगत) मी टोणगा अं! बरं आहे.

**नारद** — भावापासून काय त्रास?

**तुंबरू** — अहो, त्याची माझ्यावर वाईट नजर आहे.

**ब्रह्मानंद** — (स्वगत) परवां आवळ्यानं तोंड आंबट झालं म्हणून रुचि येण्याकरितां मीं इचें सहज चुंबन मागितलं, तर ही खुशाल निर्लज्जपणानं

दुसऱ्याजवळ सांगत बसली. अलीकडच्या मुली फार निर्भीड यांत कांहीं शंका नाहीं.

**नारद**—मघांशी तुम्हीं सांगितलंत कीं, तुम्हांला उपशिक्षकाचा मान दिला आहे; आणि आतां म्हणतां वाईट नजर आहे.

**तुंबरू**—केवळ स्वरूपाकडे पाहून विद्यार्थिनीला हा मान मिळाला म्हणजेच समजावं कीं, महामहोपाध्यायांच्या मनांत कांहीं तरी काळंबेरं आहे; पण या लष्कराच्या भाकरी भाजून आपल्याला काय लाभ? यासाठीं तो लोचट टोणगा कसा लाथाळायचा, त्याला कांहीं तरी युक्ति सांगा तरच राहीन.

**ब्रह्मानंद**—(स्वगत) मी टोणगा. मला ही टिचभर पोर लाथाडणार आणि तिला तें चवचाल बाळ युक्ति सांगणार!

**नारद**—युक्ति थोडी आहे. फारच आणिबाणीचा प्रसंग आला तर मूळ स्वरूप प्रगट करून दुगाण्या झाडा म्हणजे झालं.

**ब्रह्मानंद**—(जवळ जाऊन) कां, पकडलं कीं नाहीं? ही तुझी बहीण ना?

**नारद**—होय, मग?

**ब्रह्मानंद**—बहिणीशीं बोलायला एकांत लागतो? तुमचे कसले बेत चालले होते? सांग भातुकलीचे म्हणून.

**नारद**—कर नाहीं त्याला डर कशाला? या म्हणतात—

**ब्रह्मानंद**—या कोण? तुझ्या काकी कीं मामी?

**नारद**—का होईना? म्हणतात कीं, तुमची त्यांच्यावर वाईट नजर आहे.

**ब्रह्मानंद**—त्यांत तुझ्या आजोबाचं काय जातं?

**नारद**—काय जातं म्हणजे? आमच्या आजोबाचं माझ्यापेक्षां तिच्यावर फार प्रेम आहे. तेव्हां—

**ब्रह्मानंद**—पुरे, पुरे. अरे, ज्या गांवच्या बोरी, त्याच गांवच्या बाभळी. तुझ्या आजोबाला सांग कीं, जशी तुझी इच्यावर नजर आहे—

**नारद**—माझी नजर इच्यावर? तुम्हांला जशी सदानंदा तशी ही मला.

**ब्रह्मानंद**—ती विकतची आणि ही फुकटची. त्याचा अर्थ तोच.

**नारद**—एकूण सदानंदा तुमची—

**ब्रह्मानंद**—आमची कोणीहि असो; तुला आमच्या घरांतली उठाठेव कशाला?

**नारद**—तुम्हांला जर आपल्या बहिणीविषयीं माहिती सांगावयाची नाहीं, तर आम्हीही आमच्या बहिणीची एक खुबी आहे ती सांगणार नाहीं.

**ब्रह्मानंद**—होय का? बरं विचार.

**नारद**—सदानंदा तुमची बहीण ना?

**ब्रह्मानंद**—होय; पण भाऊबिजेपुरती.

**नारद**—मग विश्वमोहिनीचे तुम्ही कोण?

**ब्रह्मानंद**—माझ्या आईबापांपासून मागून घेतलेला मुलगा.

**नारद**—मग ती तुमची आई नव्हे तर?

**ब्रह्मानंद**—आहे, पण जेवणापुरती.

**नारद**—बरं, सदानंदा ही म्हातारीची कोण?

**ब्रह्मानंद**—विकत घेतलेली मुलगी.

**नारद**—आणि महानंदा?

**ब्रह्मानंद**—महादेवाच्या देवळांत सांपडलेली मुलगी.

**नारद**—एकूण तुम्ही कोणी मागून घेतलेले, कुणी विकत घेतलेले व कुणी सांपडलेले असेच थालिपिठे बहीणभाऊ आहांत म्हणायचे!

**ब्रह्मानंद**—अरे, वेश्यांच्या घरांत असलाच गोतावळा फार. बरं, तुझ्या बहिणीची काय खुबी आहे ती सांग.

**नारद**—तें मग सांगतों. बरं, हें तुमचं बहीणभावांचं त्रिकूट या म्हातारीच्या घरांत कुणीकडून आलं तें अगोदर सांगा पाहूं.

**ब्रह्मानंद**—ही म्हातारी घरंदाज असून हिची मिळकतही अफाट आहे. पण तिला कुणी औरस वारस नसल्यामुळें तिनं मला दत्तक घेण्याकरितां माझ्या आईबापांपासून मागून घेतलं. परंतु पुढं तिनं दत्तक घेण्याचा बेत रहित केला.

**नारद**—कारण?

**ब्रह्मानंद**—कारण विश्वयोषितेच्या मिळकतीला वारस मुलगीच पाहिजे. पण मी पडलों पुरुष.

**नारद**—होय का? बरं झालं लवकर सांगितलंत, मी विसरलों होतों. बरं पुढं?

**ब्रह्मानंद**—पुढं तिनं एका यात्रेकरणीकडून या सदानंदेला विकत घेतली;

पण पुढं हिच्या सांगण्यांत असं आलं कीं, तिचं पूर्वीच कोणाशीं लग्न झालं असून तिला त्या बाईनं फूस लावून आणली. झालं. तिलाही वारस करण्याचं रहित झालं. मग या म्हातारीनं महादेवाच्या देवळांत ब्राह्मण अनुष्ठानाला बसविले, तेव्हां एकविसाव्या दिवशीं त्यांच्या उपाध्येबोवांना साक्षात्कार झाला.

**नारद**—तो काय ?

**ब्रह्मानंद**—कीं महाशिवरात्रीच्या रात्रीं देवळाचे गाभाऱ्यांत जी मुलगी सांपडेल, ती म्हातारीनं आपली समजून वारस करावी. तीच ही महानंदा.

**नारद**—बरं, ही म्हातारी इतकी श्रीमंत आहे, तर ती या मुलींना तनुविक्रय करण्याचा आग्रह कां करते ?

**ब्रह्मानंद**—त्याचं कारण "आधीं होती दासी, पट्टराणी केलं तिसी, तिचं हिंडणं राहिना आणि मूळ स्वभाव जाईना." तशी गत आहे म्हातारीची. पण पोरी कसल्या वस्ताद.

**नारद**—त्या कशा ?

**ब्रह्मानंद**—ती धाकटी या भानगडींत मुळींच पडत नाहीं आणि थोरली लाख-पन्नास हजारांच्या लचक्यावांचून कोणाकडे ढुंकूनहि पहात नाहीं. कधीं पाहिलंच तर त्या माणसाला रात्रीं विड्यांतून भूल देते आणि सकाळीं हाकलून लावते.

**नारद**—होय का ? तरीच आमचे धनीसाहेब आज दोन दिवस डिंकदाणींतल्या माशीप्रमाणं अडकून राहिले आहेत.

**ब्रह्मानंद**—बरं, आतां तुझ्या बहिणीची काय खुबी आहे, ती सांग पाहूं.

**नारद**—( हळूच ) माझी बहीण फार खोडकर आहे. तिच्या वाटेला जाऊं नका अं ! ती रागावली म्हणजे घोडा होऊन दुगाण्या झाडते. त्या सपाट्यांत तुमचं थोबाड फुटेल ; म्हणून आगाऊ सूचना देऊन मी चाललों बघा. ( जातो. )

**ब्रह्मानंद**—काय लेकाचा पाताळयंत्री आहे तरी. काय ग, मी टोणगा आहें नाहीं ? चल आतां गायनशाळेंत.

**तुंबरू**—आपल्याला माझ्या भावानं सांगितलंच आहे, तरी पुनः मी एक वेळ बजावून सांगतें—

२७ पद—(धरा उद्धरीली दंष्ट्रे जयें)

**विषाची परीक्षा घेऊं नये ॥ धृ० ॥ घात जयानें होत जिवाचा ॥ पचे काय तें पाहूं नये ॥ १ ॥ दीप पतंगा व्याध कुरंगा ॥ अजाणें-पणें प्राणास ये ॥ २ ॥ सीताभिलाषें लंकापतीही ॥ कुलांगार झाला कैसा स्वयें ॥ ३ ॥** (जातात.)

---

## प्रवेश २ रा

**स्थळ**—सदानंदेचा महाल

**पात्रें**—(विश्वमोहिनी व सदानंदा बसल्या आहेत.)

**विश्वमोहिनी**—काल रात्रीं त्यांना तुझा संशय आला?

**सदानंदा**—होय. विडा देत असतांना चमत्कारिक मुद्रेनं त्यांनीं माझ्या-कडे पाहिलं.

**विश्वमोहिनी**—स्त्रियांच्या हातांतून विडा घेतांना चमत्कारिक रीतीनं पहाण्याची ती पुरुषांची वेळच असते. त्यांत भिण्यासारखं कांहीं नाहीं. समजलं?

**सदानंदा**—पण आई, मला हें कृत्य करतांना धास्ती वाटते.

**विश्वमोहिनी**—आजच्या दिवस कर. मग आपण उद्यां त्याची वाटच लावून टाकूं.

**सदानंदा**—पण आई, यांत पाप नाहीं का ग?

**विश्वमोहिनी**—कुळधर्म, कुळाचार करण्यांत पाप? वेडी कुठली!

**सदानंदा**—आई, आपला कुळधर्म कोणता ग?

**विश्वमोहिनी**—निदान शंभर तरी यजमान करणं.

**सदानंदा**—आणि कुळाचार?

**विश्वमोहिनी**—त्या प्रत्येकाचा कांहीं तरी अपघात करणं.

**सदानंदा**—याला कांहीं आधार?

**विश्वमोहिनी**—कुणी देवापुढं नारळ फोडतात, आणि कुणी बकऱ्याचं मुण्डकं तोडतात. हा आधार लहान का आहे?

**सदानंदा** — एकाचं एक तर दुसऱ्याचं दुसरंच. असं कां ग?

**विश्वमोहिनी** — तसा सृष्टिक्रमच आहे. ब्राह्मण संतुष्ट राहिला तर योग्यता पावतो आणि राजा संतुष्ट राहिला तर पदच्युत होतो. तसंच कुलांगना लाज धरून वागली तर स्वर्गाला जाते आणि वारांगना लाज धरून वागली तर भिकेला लागते. एकाचं पुण्य तें दुसऱ्याचं पाप. बरं, ते पहा तुझे धनी आले. तेवढा गळयांतला कंठा मागून घे म्हणजे आज तुला साखरभात करून घालीन.

(इंद्र येतो. सदानंदा विडा देते.)

**इंद्र** — (त्रासानें) पुरे झाला तो विडा. पानं चघळून चघळून जीभ चरबट होते आणि घशाला कोरड पडते.

**विश्वमोहिनी** — नाहीं तेंच मेलं अभद्र बोलायचं.

**इंद्र** — यांत काय अभद्र बोललों बुवा? घशाला कोरड पडते म्हणालों.

**विश्वमोहिनी** — कपाळाला डाग पडतो, म्हणून सवाष्ण बायकांनीं कुंकूं न लावणं, यापेक्षां जीभ चरबट होते म्हणून रंगेल माणसांनीं विडा न खाणं जास्त अभद्र आहे.

**इंद्र** — म्हणजे मी मुळींच विडा खात नाहीं असं नाहीं. कांहीं कांहीं बायका सवाष्ण आहेत कीं नाहींत, अशी भ्रांति पडण्यासारखीं जशी कुंकवाची बारीक टिकली लावतात, तसा मी रंगेल असावा किंवा नसावा, अशी लोकांना भ्रांति पडण्यासारखी छोटीशी पट्टी खातों.

**विश्वमोहिनी** — अहो, पण त्या कुंकवाच्या बारीक टिकलीनं जसं बायकांचं सवाष्णपण आकुंचित दिसतं, तसं छोट्याशा पट्टीनं तुमचं रंगेलपण दिसेल. म्हणून म्हणतें, ती चांगला घळघळीत विडा देते आहे तो घ्या.

**इंद्र** — द्या बोवा. (विडा चघळतो.)

**विश्वमोहिनी** — मुली, मला म्हातारीला तुमचा हा शृंगार पहात आतां किती वेळ उभी करणार?

**इंद्र** — अहो, उभ्या कां राहतां? खालीं बसा.

**विश्वमोहिनी** — पाडाला आलेल्या आम्रफळांत वाळलेलं अमसूल कशाला तें?

**इंद्र** — नको? बरं, तर जा.

**विश्वमोहिनी** — जाऊं कशी?

**इंद्र**—जाऊं कशी? कां बरं? पायाला मुंग्या आल्यात कीं काय? मग पाय आपटीत आपटीत जा.

**विश्वमोहिनी**—तसं नव्हे. या पोरीचं माझ्या पाठीमागं सारखं टुमणं लागलं आहे कीं, शेटजींच्या गळ्यांतल्या मोत्यांच्या पेंड्याची मला एक चांगलीशी माळ पटवून आण.

**इंद्र**—इतकंच? हें घ्या. (देतो.) मग इतका वेळ कां नाहीं बोललांत?

**विश्वमोहिनी**—बोलूं कशी? बोलावं तर लघळपणा दिसतो, बरं, न बोलावं तर तुम्हांला समजावं कसं आणि तुम्हीं द्यावं कसं? बरं, मुली चल.

**इंद्र**—म्हणजे? तुम्ही जातां आणि इलाही नेतां?

**विश्वमोहिनी**—ती आमची म्हातारी आहे ना? तिला दोन प्रहरांपासून कसंसंच वाटतंय. तिच्या सोबतीला इला बसवतें. हें पहा, तुमच्यासारखीं तरणी माणसं लागतील तितकीं मिळतील; पण म्हातारं माणूस एकदां हातचं गेलं म्हणजे परत येईल का? तुम्हीच सांगा. चल मुली. तुमच्या सोबत कुणी पाहिजे असेल तर तुमच्या नारळ्याला पाठवून देतें. तो पहा आलाच. ये बाळ, तुला शंभर वर्षे आयुष्य आहे हो. हें पहा, शेटजी तुझीच आठवण काढीत आहेत. बरं, लवकर स्नान करा. मी केशरीभात करणार आहें.

**इंद्र**—अहो, मीं कुठं आठवण काढली?

**विश्वमोहिनी**—तुम्ही काय, आम्ही काय, कुणी परके का आहोंत? चल मुली. पाव्हण्यांचा लळा सुटत नाहीं; पण करायचं कसं? (जातात.)

**इंद्र**—काय म्हातारी लबाड आहे! इथं आल्यापासून मला सारखी लुबाडीत आहे, पण त्या मुलीची आणि माझी एकांतीं कांहीं भेट होऊं देत नाहीं. नारळ्या—

**नारद**—(पळत येऊन) काय झालं धनीसाहेब?

**इंद्र**—नारळ्या, मला तर या घरांत सर्व भुताटकीचा बाजार दिसतो.

**नारद**—भुताटकीचा बाजार? अगो बया! तो कसा काय?

**इंद्र**—या महालांत मी रात्रीं निजलों कीं सकाळीं जागा होतों.

**नारद**—काय म्हणतां? रात्रीं निजलांत कीं सकाळीं जागे होतां? अरे बाप रे! तर मग आतां असं करा, सकाळीं निजा, म्हणजे रात्रीं जागे व्हाल.

**इंद्र**—अरे, तसं नव्हे.

**नारद**—तर कसं?

**इंद्र** —म्हणजे रात्रीं एकदां पलंगावर पडलों कीं ताबडतोब झोंप लागते. तो त्यावर सकाळीं उठतों. मध्यें हूं कीं चूं नाहीं.

**नारद** —असं होय ? मग त्यांत काय आहे? एखाद्याची झोंप जास्त असते. कुंभकर्ण नव्हता का सहा महिने झोंप घेत ?

**इंद्र** —अरे, तसं नव्हे.

**नारद** —तसंही नव्हे ? मग कसं ?

**इंद्र** —चमत्कार असा होतो, पलंगावर रात्रीं महानंदा व मी आनंदानं गोष्टी बोलत बसतों—

**नारद** —महानंदा व तुम्ही गोष्टी बोलत बसतां? खोटी गोष्ट.

**इंद्र** —काय म्हणतोस ?

**नारद** —हे सदानंदेलाच महानंदा समजतात नाहीं का? (उघड) कांहीं नाहीं. महानंदा व तुम्ही गोष्टी बोलत बसतां, पुढं ?

**इंद्र** —पुढं ती मला मसालेदार विडा करून देते, तो मी खातों.

**नारद** —विडा खातां ? इथंच बिघडतं. बरं, कांहीं हरकत नाहीं. पुढं ?

**इंद्र** —पुढें मला एकाएकीं गाढ निद्रा लागते, तो सकाळीं जागा होतों, आणि पाहतों तों मी जमिनीवर, पलंग माझ्यावर, आणि महानंदा पलंगावर, असं होतं.

**नारद** —कसं कसं ?

**इंद्र** —मी जमिनीवर, पलंग माझ्यावर, आणि महानंदा पलंगावर.

**नारद** —छे; असं नसेल. कांहीं तरी चुकतां आहांत, नीट आठवण करा.

**इंद्र** —मी जमिनीवर, पलंग माझ्यावर, आणि महानंदा पलंगावर असंच.

**नारद** —छे हो. महानंदेच्या खालीं पलंग, पलंगाच्या खालीं तुम्ही आणि तुमच्याखालीं जमीन. असं असेल हं !

**इंद्र** —अरे, मग तसाच माझ्या सांगण्याचा अर्थ.

**नारद** —हं ! मग बरोबर आहे.

**इंद्र** —काय ? बरोबर काय आहे ?

**नारद** —तुमची झोंप माझ्या झोंपेच्या अगदीं उलट आहे.

**इंद्र** —ती कशी ?

**नारद्**—यांचा नोकर भोपळ्या व मी रात्रीं देवडीवर एकाच्च गादीवर निजतों आणि सकाळीं उठून पहातों, तों जमिनीवर भोपळ्या, भोपळ्यावर गादी आणि गादीवर मी, असं होतं. अहो, आज सकाळीं तर भोपळ्या देवडी-वर, गादी दुसऱ्या मजल्यावर आणि मी तिसऱ्या मजल्यावर असा चमत्कार झाला. ज्या अर्थीं झोंपेंत गादी माझ्या मागें दुसऱ्या मजल्यापर्यंतच्च आली आणि तिसऱ्या मजल्यापर्यंत आली नाहीं, त्यावरून मला असं वाटतं कीं, दुसऱ्या मजल्याच्या जिन्याच्या दारापेक्षां तिसऱ्या मजल्याच्या जिन्याचं दार अरुंद असावं.

**इंद्र**—अरे मूर्खा, मी तुला जिन्याचीं दारं रुंद किंवा अरुंद विचारीत नाहीं; आपलं असं होण्याचं कारण काय तें विचारतों आहें.

**नारद्**—त्याच्यावर माझा असा तर्क चालतो कीं, या घरांतल्या गाद्या चेंडूप्रमाणं उड्या मारणाऱ्या असाव्यात. आपण वर निजलों की त्यांना उंची येत असावी. मी हलका असल्यामुळें गादीबरोबर वर जातों आणि तुम्ही जड असल्यामुळें खालीं पडतां. आहे काय ! नाहीं काय !

**इंद्र**—आतां या तुझ्या तर्कशास्त्रापुढं हंसावं की रडावं ?

**नारद्**—जो वर चढत असेल त्यानं हंसावं नि खालीं पडत असेल त्यानं रडावं.

**इंद्र**—बरं, तुझ्या म्हणण्याप्रमाणं गाद्या उड्या मारीत असतील, असं का होईना !

**नारद्**—नाहीं तर आपल्या म्हणण्याप्रमाणं आपण लोळत असूं, असं का होईना !

**इंद्र**—कसं का असेना ! पण याला आतां युक्ति ?

**नारद्**—युक्त्यांना काय हो तोटा ! असं करा, आज महानंदेच्याऐवजीं मला महालांत निजण्याची परवानगी द्या.

**इंद्र**—हं, बरं पुढं ?

**नारद्**—तुम्ही निजा पलंगावर आणि मी निजतों पलंगाच्या खालीं.

**इंद्र**—म्हणजे कसं होईल ?

**नारद्**—म्हणजे असं होईल, तुमचा झोंपेंत लोळण्याचा वेग आहे अधो-मुखी आणि माझा आहे ऊर्ध्वमुखी. लोळतां लोळतां तुमची माझी वाटेंत टक्कर

लागेल. त्यामुळें मी पलंगावर चढणार नाहीं किंवा तुम्ही पलंगाच्या खालीं पडणार नाहीं.

**इंद्र**—चल नीघ, मूर्ख कुठला! तुला सोबत निजवून घेऊन अधिक लोळणारा गाढव कोणता, हें ठरविण्याकरितां का मी आज इथं इतकी संपत्ति उधळून बसलों?

**नारद**—यांत काय संशय! वेश्यांच्या घरी जाणाऱ्या मंडळींत मोठा गाढव कोणता, हें त्यांच्या सर्वांत अधिक द्रव्य खर्च करण्यावरूनच ठरवायचं असतं.

**इंद्र**—बरं जा. त्या महानंदेला इकडे घेऊन ये.

**नारद**—कशाकरितां धनीसाहेब?

**इंद्र**—तिला माझ्या घरीं घेऊन जायचं आहे.

**नारद**—आपलं घर कुठं आहे, धनीसाहेब?

**इंद्र**—तुला काय पंचाईत? स्वर्गांत आहे.

**नारद**—म्हणजे तुम्ही आतां स्वर्गाला जाणार आणि तिथें महानंदेला नेणार?

**इंद्र**—हो, हो; आणि तिच्याबरोबर तुलाहि घेऊन जाणार!

**नारद**—छट्, तिची आई तिला इतक्यांत स्वर्गाला जाऊं देणार नाहीं आणि माझी पण खुशी नाही. तुम्हांला पाहिजे तर तुम्ही खुशाल जा आणि आमच्या आईबापांना सांगा कीं, नारळ्या व तुम्बा खुशाल आहेत.

**इंद्र**—तूं लागलास का पुनः तर्कटायला? मी सांगेन तेवढं काम कर आणि विचारीन तेवढ्याचंच उत्तर दे. कुंभारापेक्षां गाढव शहाणा मला नको.

**नारद**—राहिलं. आपण सांगा.

**इंद्र**—हळूच जा आणि महानंदेला इकडे घेऊन ये.

**नारद**—पण त्यांनीं कशाला म्हणून विचारलं तर काय सांगूं?

**इंद्र**—कांहीं जरुरीचं काम आहे म्हणावं.

**नारद**—जरुरीचं काम काय म्हणून विचारलं तर तुम्ही स्वर्गाला जाण्याच्या पंथाला लागलां आहांत, म्हणून भेटायला—

**इंद्र**—आतां जास्त वटवट करशील तर मरेमरेतों धोपटीन.

**नारद**—धोपटा बापडे! आपलं काम व्हावं आणि माझे हेलपाटे वांचावे, म्हणून खटपट. नाहीं ऐकत? नका. महानंदेचं नखसुद्धां दृष्टीला पडलं नाही तर ही तऱ्हा!

**इंद्र** —अरे, तुझं डोकं फिरलं आहे कीं काय ?

**नारद** —तें कसं ?

**इंद्र** —नख दृष्टीला पडलं नाहीं काय म्हणतोस ? आतां महानंदा व मी बोलत नव्हतों ?

**नारद** —जिच्याशीं बोलत होतां तिला होय ? आतां आणतों. ( जाऊं लागतो ).

**इंद्र** —अरे ए अजागळा, थांब, बोलत होतों ती म्हणजे म्हातारी नव्हे हं ?

**नारद** —छे-छे, ती दुसरी. जिला तुम्ही महानंदा समजतां तिला ना ! एकदां सोडून पन्नासदां आणीन.

**इंद्र** —अरे थांब. महानंदा समजतां म्हणजे ?

**नारद** —म्हणजे शिंपल्याला चांदी समजणं, दोरीला सर्प समजणं, मृगजलाला नदी समजणं, याहीपेक्षां थोडक्यांत सांगावयाचं म्हणजे जें नाहीं त्याला आहे समजणं.

**इंद्र** —म्हणजे आतां येथून गेली ती महानंदा नव्हे ?

**नारद** —नव्हे. एकदां नव्हे, दहादां नव्हे, शंभरदां नव्हे.

**इंद्र** —तर मग ती कोण ?

**नारद** —ती सदानंदा.

**इंद्र** —हा काय घोटाळा बोवा ?

**नारद** —यांत कसला घोटाळा बोवा ! महानंदा म्हणजे एकदम मोठा आनंद देणारी आणि सदानंदा म्हणजे थोडाच पण सदोदित आनंद देणारी. एकाच दिवशीं महानंद होऊन वायु होण्यापेक्षां आपल्याला थोडाच का होईना, पण सदानंद बरा. असा पोक्त विचार करून त्यांनीं महानंदेऐवजीं आपल्याला सदानंदा अर्पण केली.

**इंद्र** —तें कांहीं नाहीं. जा आणि तूं जिला महानंदा म्हणतोस तिला घेऊन ये. ( नारद जातो. ) हें मायलेकींचं शेळीचं जोडपं या दागिन्यांच्या झाडाला सारखं ओरबडून घेत आहे आणि मीही अगदीं चुळबूळ न करतां अंगाची साल काढून देत आहें. बरं, याची फलश्रुति काय म्हणावी तर त्या सुंदरीशीं थोडा वेळ श्रृंगारिक भाषण व तिनं दिलेला तांबूलभक्षण. बस्स. मग जी गाढ झाप येते तों सकाळीं जागा होतों. अशी स्थिति असून हें कारटं म्हणतं की, ती

मुळीं महानंदाच नव्हे; मग ही कोण घोरपड यांनीं माझ्या गळ्यांत बांधली? आतां ती आली म्हणजे सर्व संशय दूर होईलच. तरी पण मी प्रथम कल्पना केली तितकी महानंदा वश करणं स्वल्प नाहीं असं दिसतं खरं.

**नारद** —(प्रवेश करून) धनीसाहेब, या पहा महानंदा ताईसाहेब.
(महानंदा प्रगट होते.)

**इंद्र** — अहाहा! काय हें रूपसौंदर्य!

२८ **पद** —(लावणी)

**“या सौंदर्याची सीमा वाटते रतिहुनि अति उत्तमा॥ हा पाहुनि मुखचंद्रमा। गमेलची आमा खचित पौर्णिमा॥ काय अधराचा रक्तिमा। लाजवी कुंकुम नव विद्रुमा॥ अंगीं वसन असे भर्जरी॥ कुण्या सुभगाची मदनमंजिरी॥ सांग सखे सुंदरी॥१॥ शिरिं सुंदर नवमाल्लिका झटाति वर मधुकर रस कौतुका॥ नयनांत खंजरंजिका मधुर कंठांत लाजवी पिका॥ मज वाटतसे निर्झरी॥ कुण्या० ॥२॥”**

**नारद** — धनीसाहेब, बहिर्दृष्टीनें पाहून या स्वरूपाचं अगदीं यथायोग्य वर्णन केलंत. तसंच अंतर्ज्ञानानं याची योग्यता जाणून करद्वय जोडून साष्टांग नमस्कार ठोका कीं देवाची कृपा झालीच समजा.

**इंद्र** —मीं जो आपल्या संपत्तीचा इतका व्यय केला, तो इला देवी समजण्याकरितां नव्हे. इची मीं आगाऊ किंमत दिली आहे. आतां ही सामोपचारानं मजबरोबर आली तर ठीक नाहीं तर मी इला बलात्कारानं हरण करून नेणार. इच्या आईची किंवा भावाची कोणाचीही पर्वा करणार नाहीं.

**नारद** — नव्हे बरं धनीसाहेब. हें रूपसौंदर्य सूर्यापेक्षां तेजस्वी, अग्नीपेक्षां प्रखर, कालकूटापेक्षां जालीम व अमृतापेक्षां गोड आहे. आपण हें सद्बुद्धीनं ग्रहण कराल तर अमृतापेक्षां गोड लागेल; पण कापट्यानं हस्तगत करूं पहाल तर कालकूटाप्रमाणं आपल्या देहाचा दाह करील आणि बलात्कारानं हस्तगत करूं पहाल तर अग्नीप्रमाणं तुमचं सर्वांग जाळून भस्म करील.

**इंद्र** — पंडितांच्या सभेंतील धर्मशास्त्र किंवा न्यायकचेरींतील न्यायशास्त्र दाखवून, घरावर पडलेला दरोडा नाहींसा होईल का? नाहीं. त्याला दंडाच हातांत घेतला पाहिजे. विदुरनीतीच्या गोष्टी सांगून मांजर चोरून दूध पिण्याचं सोडील

का? नाहीं. त्याच्या पाठींत फुंकणीच बसविली पाहिजे. तसंच ज्या मालावर वास्तविक आपली मालकी, त्याच्यावर कुणी कपटानं हक्क सांगूं लागला, तर त्याच्या पायां पडून भागेल का? नाहीं. तर तो माल बलात्कारानंच हरण केला पाहिजे. (तिला बलात्कारानें धरावयास जातो. ती रागानें पहाते. इंद्र अंध होऊन खालीं पडतो. महानंदा अदृश्य होते.) अरे नारळ्या, धांव धांव, मेलों, जळालों धांव, धांव.

२९ पद — (मल्हार – झंपा – ऊन आई बदरिया.)

**अंगीं आली बधिरता ॥ स्थिति मज भयार्ता ॥ दुःखप्रद गमत ॥ धृ० ॥ जल स्त्रवत द्वयनेत्रीं । झळ निघत या श्रोत्रीं । हृद जळत पद गळत । शिर थरथरत ॥ १ ॥**

**नारद** — अरेरे! धनीसाहेब, या महानंदेनं आपल्या नांवाच्याविरुद्ध कशी कृति केलीन् हो? ही माया हो माया!

**इंद्र** — नारळ्या, ती आहे का गेली रे?

**नारद** — गेली, गेली. तेव्हांच पार. वाहवा ग आदिमाये! छान केलंस.

**इंद्र** — नारळ्या, ती कोणी तरी अलौकिक स्त्री असावी. अग आई ग!

**नारद** — धनीसाहेब, ती विश्वकौटाळीण असावी आणि तिनं तुमच्यावर कांहीं चेटूक, करणी, जादूटोणा —

**इंद्र** — अशा जादूटोण्याला मी दाद देणारा नव्हे. कशाची करणी आणि कशाचं चेटूक —

३० पद — (मल्हार – एक्का – तूं है महोंमहसा.)

**हे तो कर्मदशा मज ऐशा सुरेशा नेई विनाशा ॥ धृ० ॥ दोन्ही नेत्र असुनि पात्र नर अंध व्हावा । अहि तुडवावा । तरि चावा न घ्यावा तयें कसा ॥ १ ॥**

नारळ्या, आतां तूं माझं एक काम कर.

**नारद** — आतां काय राहिलं? बहुतेक सर्व काम बरोबर केलं आहे.

**इंद्र** — मला कोणाच्या नकळत गांवाबाहेर घेऊन चल आणि नदीच्या डोहांत ढकलून दे.

**नारद** — म्हणजे जलसमाधि? पण संन्यासाश्रमाच्याच आधीं? महत्पाप, महत्पाप.

**इंद्र** — आतां पापपुण्य कसलं? दैवांत जें लिहिलं असेल, तं भोगलं पाहिजे.

**नारद** — चुलींत तोंड खुपसायचं आणि माझ्या दैवांत लिहिलं होतं म्हणायचं. अहो —

**३१ पद** — ( सारंग – त्रिवट – जान हमारी. )

**स्वयें विस्तरीलें तें तें स्वयें निस्तरावें ॥ धृ० ॥ हस्त पाद कर्मे करितीं ॥ सकल अवयवां तीं घडतीं ॥ सुख दुःख येतां तुह्मि कां हंसावें रडावें? ॥ १ ॥ सौख्य लाभ तो मीं आणिला ॥ दुःखभाग दैवें दिधला ॥ असें चित्त चंचल त्यानें भवाब्धीं बुडावें ॥ २ ॥** ( जातात. )

---

## प्रवेश ३ रा

**स्थळ** — गंधर्व गायनशाळा

( ब्रह्मानंद उच्चासनावर बसला आहे. )

**ब्रह्मानंद** — ( त्रासून ) अरे, जरा हळू वाजवा. ही काय गायनशाळा आहे, कीं जत्रा आहे? तुम्बाजी, जरा इकडे या पाहूं. तुम्ही कालच्या जलशांत आपल्या गायनशाळेचं तत्त्व अगदीं विसरलांत.

**तुंबरू** — तें काय गुरुजी?

**ब्रह्मानंद** — तुम्हांला मंडळीनीं कानडा गायला सांगितला, तेव्हां 'आदौ रामतपोवनादि गमनं' हा श्लोक कानड्यांत ठोकून द्यायचा सोडून तुम्ही अस्सल चीज गायलांत ही चूक केलीत.

**तुंबरू** — गुरुजी, मला रागरागिणींत श्लोक गातां येत नाहीं.

**ब्रह्मानंद** — त्यांत हो काय आहे? मूळ चीज ध्यानांत आणून श्लोकांचे शब्द ओढाताण करून गावेत. म्हणजे असं. तुम्हीं कोणती चीज गायलीत?

**तुंबरू** — 'तूम सोही करीम रहीम हकीम पाक परवर दिगार' ही गायली.

**ब्रह्मानंद** — हं. आतां या चिजेचे सूर ध्यानांत आणायचे आणि त्याप्रमाणं 'आदौ राम' हा श्लोक असा म्हणायचा. (गाऊन दाखवितो.) बरं, चीज म्हणालांत ती शाळेतल्या मुलानं 'वारा कसा शीतळ मंद येतो' म्हटल्याप्रमाणं स्वच्छ म्हणालांत. ती तरी गवई लोकांप्रमाणं म्हणालांत?

**तुंबरू** — गवई लोकांप्रमाणं ती कशी?

**ब्रह्मानंद** — गवई लोकांप्रमाणं म्हणजे जिभेचा शेंडा तुटलेल्या बोबड्याप्रमाणं. प्रत्येक शब्दाचं पहिलं अक्षर स्वच्छ उच्चारायचं व बाकीच्या सर्व अक्षरांबद्दल अ म्हणायचं. म्हणजे 'तूम सोही करीम रहीम हकीम पाक परवरदिगार' हे शब्द गवई थाटानं म्हणायचे म्हणजे 'तूं अ सोई कईम अईम हईम पाअ पअ वअ दिआअ' असं म्हणायचं. म्हणजे आपण गातां गातां कोणाला आपली चीज उतरून घेतां येऊं नये.

**तुंबरू** — लोकांनीं आपल्या चिजा उतरून घेतल्या म्हणून आपल्याजवळच्या थोड्याच नाहींशा होणार आहेत?

**ब्रह्मानंद** — चुकतां तुम्ही. गवयांनीं मेल्यावर आपल्या चिजा स्वर्गलोकांत आपल्याबरोबर नेल्या तरच त्यांना इंद्राचे कचेरींत गंधर्वांची जागा मिळतें. बरं, आतां यापुढें नीट लक्षांत ठेवा. बरं, पायांत चाळ बांधा. तुम्हांला एक उत्तम गत शिकवतों. (तुंबरू पायांत चाळ बांधतो.) अरे, सर्व जण हत्यारं जाग्यावर ठेवून सुट्टी घ्या व उद्यां लवकर या. जा. (विद्यार्थी जातात.) प्रथम परवां शिकविलेलीं पावलं टाका पाहूं. एक दोन तीन चार छ छ छूं छा.. छ छ छूं छा. छ छ छूं छा. शाबास. आतां तुम्हांला वृक्षलतालिंगनन्यास शिकवतों.

**तुंबरू** — कसला न्यास?

**ब्रह्मानंद** — वृक्षलतालिंगनन्यास!

**तुंबरू** — वृक्षलतालिंगनन्यास म्हणजे?

**ब्रह्मानंद** — वृक्षलतालिंगनन्यास म्हणजे झाडावर वेल चढते, तसा नाचाचा एक प्रकार आहे. मीं इथं असं उभं राहायचं. तुम्हीं तिथून आतांच्या पावलांनीं एक दोन तीन चार करीत माझ्याजवळ यायचं. पहिला छ छ छूं छा करून

तुमचा उजवा हात माझ्या उजव्या कंबरेवर ठेवायचा. दुसरा छ छ छूं छा करून माझा डावा हात तुमच्या डाव्या कंबरेवर ठेवायचा. तिसरा छ छ छूं छा करून तुमचा उजवा व माझा डावा पाय असा ताठ धरावयाचा आणि मग आपण दोघांनीं मिळून बरोबर एक दोन तीन चार एक दोन तीन चार छ छ छूं छा छ छ छूं छा छ छ छूं छा असं करायला सुरवात करायची.

**तुंबरू**—मला तो वृक्षलतालिंगनन्यास शिकणं नको. आणि तुम्हांला बरोबर घेऊन नाचणंही नको.

**ब्रह्मानंद**—तुम्हांला कळत नाही. अहो, पुरुष व स्त्री यांनीं एकमेकांचे हातांत हात व पायांत पाय घालून नाचण्यांत कौशल्यदृष्ट्या अधिक महत्त्व आहे. तांडवनृत्याचे वेळी महादेव अर्धनारीनटेश्वराचं रूप धारण करनात, त्यांतलं तत्त्व तरी हेंच.

**तुंबरू**—लोकांचें तत्त्व घेऊन मला काय करायचं आहे? माझं तत्त्व तें खरं!

**ब्रह्मानंद**—शुष्क गोष्टीत उगीच वाद वाढवूं नये. आपल्याला साध्य काय करायचं आहे आणि त्याला साधन कोणतं पाहिजे आहे, इकडे नेहमी नजर द्यावी. चला, करा सुरू. मी ताल धरतों आणि तुम्ही पावलं टाका. एक, दोन, तीन, चार, चला पुढे, एक, दोन, तीन, चार, चला.

**तुंबरू**—मी साफ येणार नाही.

**ब्रह्मानंद**—तुम्ही गुण्यागोविदानं मनुष्याप्रमाणं शिकणार नाही, तर मला हातांत चाबूक घेऊन अडेल घोड्याप्रमाणं शिकवावं लागेल.

**तुंबरू**—मग मलाही त्याच्या प्रतिकारार्थ दुगाण्या झाडाव्या लागतील.

**ब्रह्मानंद**—बरं पाहूं आतां. शेंडी तुटते कीं पारंबी तुटते. घेतली खरी एक दोन तीन चार.

(तुंबरू पडद्याआड दडतो. बराच वेळ वाट पाहून तो येत नाही म्हणून ब्रह्मानंद पडदा बाजूला सारतो. तो अंगावर घोडा धांवून येतो. ब्रह्मानंद ‘मेलो मेलो, धांवा धांवा’ करीत पडतो.)

---

## प्रवेश ४ था

**स्थळ** — महानंदेच्या महालाबाहेरील दालन.

**पात्रें** — ( महानंदा विचार करीत येते. )

**३२ पद** — ( भैरवी-त्रिवट )

**शरिर दिलें जरि मायबापें। अंतर मति जुळवि परमेश वळवि कळवि। सद्सद् भ्रमा पळवि दुरि ॥ धृ० ॥ बोधिति हे मज मिळवि बहुत धन। गमत तेंच मजला वमन। ह्वदिं वाटे जसें विखार ॥ १ ॥ सांगति कीं बहु भुलवि तरुण जन। दिसति बंधुसम ते स्वजन। मग कैशी करूं विहार ॥ २ ॥**

**विश्वमोहिनी** — बाळे, आपल्याशींच काय विचार करतेस? तुझी मैत्रीण कुठं दिसत नाहीं?

**महानंदा** — ती ब्रह्मानंददादाच्या गायनशाळेंत गेली आहे. खरंच आई, ती माझ्याजवळ नसली म्हणजे मला अगदीं चुकल्यासारखं वाटतं. तिच्यासारखी मैत्रीण या जगांत मिळायची नाहीं.

**विश्वमोहिनी** — सुख कशाला म्हणतात आणि तें देणारे तरुण बायकांचे खरे मित्र कोण हें तुला समजत नाहीं, म्हणून असं म्हणतेस. आणि त्यासाठीं तर मी रात्रंदिवस तुझ्या कानींकपाळीं सारखी ओरडते आहे. तूं आतां कांहीं लहान नाहींस. तुला आतां बाळपणाच्या मैत्रिणी सोडून देऊन सुख मिळवायला तरुणपणचे मित्र पाहिले पाहिजेत.

**महानंदा** — मग त्याला मीं आपली संमति दिली नाहीं का?

**विश्वमोहिनी** — अहाहा! कांहीं तरी विलक्षण अट घालणं म्हणजे पर्यायानं नाहीं म्हणण्यासारखंच आहे. त्याला कुणी संमति म्हणेल का? पृथ्वीच्या मोलाचं कंकण घेऊन स्वर्गांतला कोणता देव येणार आहे कुणाला ठाऊक!

**महानंदा** — रंभाऊर्वशीप्रमाणं तूं दिसतेस असं तूंच ना मला म्हणतेस? मग अशा ऊर्वशीला सुख देण्याला कुणी तरी विक्रमादित्यासारखा नको का?

**विश्वमोहिनी** — 'अग, वेळेला केळं आणि वनवासाला सिताफळं!' पाहिजे, तूं म्हणतेस तसा पाहिजे; पण नसला तर त्याच्याकरतां अडून का बसायचं?

आपल्याला कुणीकडून तरी कामदेवाचं मंदिर उभारायचं. मग तें एकाच्या देणगीनं काय अन् दहा जणांच्या हातभारानं काय ?

**महानंदा**—आई, चातकीचा घसा तहानेनं कोरडा पडला तरी ती वर्षाकालाची वाट पाहत मेघबिंदूची अपेक्षा करून राहील, दर्दुरीप्रमाणं डबक्यांतील उदक प्राशन करील का? त्याचप्रमाणें श्रीमहादेवाच्या प्रसादानं जन्माला आलेली गणिका पृथ्वीच्या मोलाचं कंकण देणाऱ्यासाठीं आपलं सर्व तारुण्य खर्ची घालील, परंतु रासवट वेश्येप्रमाणं अर्ध्या हळकुंडानं पिवळ्या होणाऱ्या विषयी जनांच्या कामवासनेला बळी पडेल काय ?

३३ पद—( कारि बदरिया हाय )

**बोध करिसि हा काय गे आई ॥ ध्रु० ॥ धनवंत तरुण अनुरक्त बघुन मंजु वचांनीं वंचु सदनिं या काय ॥ १ ॥ विमल कमल सम तनु ऐशी मम मत्त करि करीं चूर्ण करवुं कीं काय ॥ २ ॥ धीवर नयनीं मीना बघुनी रति-सुख देऊं लोकिं पसरुनि काय ॥ ३ ॥**

**विश्वमोहिनी**—आपल्या धंद्याचं वर्म व तुझ्या खऱ्या सुखाचं साधन म्हणून मी जें काय तुला सांगतें, तें तुझ्या अनहिताचं असं का तुला वाटतं ?

**महानंदा**—धंद्याच्या दृष्टीनं गणिकेच्या आईनं असाच उपदेश करणं योग्य आहे, आणि जिला आपली काया सैरावैरा धांवणाऱ्या मानवरूपी कावळ्याकरतां चवाठ्यावर ठेवायची असेल, तिनं तो ऐकणंहि योग्य आहे.

**विश्वमोहिनी**—मग तूं माझं ऐकत नाहींस ती ?

**महानंदा**—वारयोषिता असून पतिव्रता होतां येतं, हें मला कृतीनं करून दाखवायचं आहे म्हणून.

**विश्वमोहिनी**—वारयोषिता असून पतिव्रता? तुला वेड तर नाहीं लागलं ? वांझ असून पुत्रवती, विधवा असून सौभाग्यवती, भिकारी असून चक्रवर्ती अशी परस्परविरोधी स्थिति एकाच व्यक्तीच्या ठिकाणीं संभवेल का ?

**महानंदा**—संभवेलच काय, पण प्रत्यक्ष असल्याचीं उदाहरणं पुराणांत नाहींत का? कुंती पतिसंगति नसून पुत्रवती. सावित्री पति मृत झाला असून सौभाग्यवती. ध्रुव निर्धन असून चक्रवर्ती. निकृष्ट स्थिति जाऊन उच्च स्थिति येण्याला आपली कृतिच कारण होते.

**विश्वमोहिनी**—ह्या गोष्टी निवान्त वेळीं नुसत्या बोलायला किंवा ऐकायला चांगल्या. प्रत्यक्ष वागणुकीला आपला धर्म फारच सोपा. म्हणून तूं या पुराणांतील बिकट भानगडींत न पडतां मी सांगतें या अल्प श्रमानं अपार संपत्ति मिळविण्याच्या सरळ मार्गाचं अवलंबन कर. तुला सांगायचं तितकं सांगितलं, आतां तुझं नशीब तुझ्याबरोबर! (जाते.)

**महानंदा**—बाल्य, तारुण्य व वार्धक्य असा जिचा सर्व आयुष्यक्रम चिखलामध्ये गेला अशा बेटकुळीला परम पवित्र अशा भागीरथीच्या पाण्याचं महत्त्व काय ठाऊक! शिव, शिव! परमेश्वरा, आमच्या गणिकाजनाची कोण ही शोचनीय स्थिति! तारुण्याच्या भरभराटीत, विषयाच्या क्षणिक विलासानं, गुणांच्या मिथ्या प्रशंसनानं व स्वरूपाच्या भ्रामक प्रकाशानं अंध होऊन खरं-खोटं, बरं-वाईट, यांची एकच किमत करून काळ कसा आनंदांत जातो; पण पुढं वृद्धत्व आल्यावर पूर्वीच्या भरभराटीला ओहोटी लागून दांत पडल्यामुळं गातां येत नाहीं. हातापायांतील शक्ति गेल्यामुळं नृत्य करतां येत नाहीं. मुखचंद्राचं वर्तुलत्व नष्ट होऊन त्रिकोणत्व येतं. नंतर अस्थिपंजरी देहावर अलंकार घालून फाटलेल्या भागांत काजळ घालून, सुरकुतलेल्या मुखाला रंग लावून तारुण्य आणण्याचा किती जरी प्रयत्न केला तरी साधत नाहीं. आपल्या घरीं कोणी येत नाहीं. म्हणून मग वाऱ्यानं उडालेल्या खरकट्या पत्रावळीप्रमाणं आपणच दारोदार फिरावं लागतं. अशा जन्माला कोण धन्य समजत असतील त्या समजोत बिचाऱ्या! मी तर म्हणतें—

३४ पद—(मोरे गली आजारे सावलिया)

**किति अभागिनी या नायकिणी॥ वृद्धपणीं पुसती न कुणी॥ध्रु०॥**
**मधुरसविरहित शुष्क फलें कीं देति पदें जें तीं ठेचलुनी॥१॥**

(जाऊं लागते, तोच तुंबरू येतो.)

सखे, आलीस? गे. कशीपण अगदीं वेळेवर आलीस. तुझ्यावांचून मला अगदीं चुकल्याचुकल्यासारखं झालं होतं. आज गायनशाळेंत काय काय शिकलीस? दादा आला का! हें काय? तूं कांहींच बोलत नाहींस! अग बाई! डोळे भरून आले आहेत, अंग थरथर कांपत आहे! तुला असं झालं तरी काय?

३५ पद —( आज कान्ह धेरे रोके )

**सांग कां ग हिरमुसी दिससि अशी ॥ घृ० ॥ नयनाश्रु गाळीतेसी ॥ हृदयही कापवीशी ॥ भृकुटी वक्र अधरा कां चाविशी ॥ १ ॥**

**तुंबरू** —( स्फुंदत ) आज गायनशाळेंत ब्रह्मानंददादा मला वृक्षलतालिंगनन्यास शिकवतों म्हणून मिठी मारायला सांगत होता, तें मीं ऐकलं नाहीं.

( विश्वमोहिनी व ब्रह्मानंद येतो. )

**विश्वमोहिनी** — काय म्हणतोस तरी काय? ती मुलगी एकदम माणसाचा घोडा झाली? तो पोरगा व त्याचा शेटजी एकदम नाहींसे झाले, तेव्हांच मला वाटलं, कीं हीं तिघं जणं पिशाच्च असावींत आणि यांनीं माझ्या मुली घेरून टाकल्या आहेत. तरींच बरं, माझी महानंदा या जखिणीच्या नादानं अलीकडे फार हट्ट करूं लागली. चल, आतांच्या आतां त्या हडळीच्या हाताला धरून घराच्या बाहेर काढूं. ( तुंबरूस पाहून घाबरून ) बया, माझे आई, तूं कोणीहि ऐस. माझ्या पोरानं तुझा अपराध केला असला तर पोटांत घाल. आम्ही तुझी खणानारळानं ओटी भरूं. पण माझ्या या लेंकरांना सोडून चालती हो. कारट्या, तिच्या पायां पड. ( विश्वमोहिनी व ब्रह्मानंद पायां पडतात. )

**महानंदा** — आई, हें तूं कुणाला काय म्हणतेस? तुला भ्रम तर नाहीं झाला?

**ब्रह्मानंद** — अग ताई, तूं इकडे आईजवळ येऊन उभी रहा, ती मुलगी भूत आहे. तिला मी आज नाच शिकवीत होतों तों ती मधेंच एकदम घोडा झाली आणि दुगाण्या झाडूं लागली. आज तिनं माझ्या गंधर्व गायनशाळेची घोडशाळा केली.

**महानंदा** — आपण पशूसारखं वागलं, म्हणजे दुसऱ्यालाही तसं वागणं भाग आहे.

**ब्रह्मानंद** — अग ताई, ही थट्टा नव्हे. मी पशु झालों असेन, नाहीं म्हणत नाहीं, पण कसा? कृतीनं; पण ही लागलीच्च आकृतीनं झाली.

**महानंदा** — झाली तर झाली. मला चालेल.

**विश्वमोहिनी** — तूं असा भलताच हट्ट घेऊन भुताशीं मैत्री धरशील तर मी तुझ्यापुढं जीभ हसडून प्राण देईन.

**महानंदा**—आणि तुम्ही जर माझ्या जिवाच्या मैत्रिणीला अशी विनाकारण घरांतून घालवूं लागाल, तर मीही तिच्याबरोबर निघून जाईन. आता ती पिशाच्च आहे असं तुम्हांला वाटत असेल तर तिला देवाचीं नांवं घ्यायला सांगा, म्हणजे झालं.

**ब्रह्मानंद**—म्हण ग, शंकर, शंकर.

**तुंबरू**—शंकर, शंकर.

**ब्रह्मानंद**—महादेव, महादेव.

**तुंबरू**—महादेव, महादेव.

**विश्वमोहिनी**—अरे, शंकर व महादेव एकच. तिला दुसऱ्या एखाद्या देवाचं नांव घ्यायला सांग.

**ब्रह्मानंद**—गुरुदेवदत्त, गुरुदेवदत्त.

**तुंबरू**—गुरुदेवदत्त, गुरुदेवदत्त.

**महानंदा**—सरली तुमची शंका? कांहीं शिल्लक असेल तर फेडून घ्या.

**विश्वमोहिनी**—ब्रह्मानंदा, चल. आपण अगोदर त्या दोघां पळपुट्यांनीं घरांतून कांहीं चोरून नेलं आहे कीं काय तें पाहूं; नंतर या मुलीची बारकाईनं चवकशी करूं.

**ब्रह्मानंद**—हो, खरंच. आधीं कांहीं गेलं असल्यास परत आणूं; नंतर जाणाऱ्याबद्दल पाहूं. (विश्वमोहिनी व ब्रह्मानंद जातात.)

**तुंबरू**—ताई, हे पळून गेले म्हणतात ते कोण?

**महानंदा**—तुला नाहींच का ठाऊक? तुझा भाऊ आणि त्याचा धनी सकाळपासून कुठं नाहींसे झाले.

**तुंबरू**—सदानंदेला घेऊन?

**महानंदा**—छे, सदानंदा घरांतच आहे; पण काय ग सखे, तुझा भाऊ तुला टाकून पळून गेला त्याचं तुला कांहींच वाईट वाटत नाहीं?

**तुंबरू**—अग, तसाच तो पळपुट्या आहे. जिथं जाईल तिथं कांहीं तरी कलागत लावील आणि बाजू अंगावर आली कीं पळ काढील. मग त्याच्याबद्दल काय वाईट वाटायचं? शिवाय देवानं भाऊ नेला तर त्याच्याबद्दल ही

आईप्रमाणं लोभ करणारी बहीण दिली, म्हणून मला उलट आनंदच होत आहे. बरं, पण त्या दोघांना असं पळून जाण्याचं कारण ?

**महानंदा**—सकाळीं असं झालं, तुझ्या भावानं आपले धनी बोलावीत आहेत असा मला निरोप सांगितला. सदानंदा तिथं असेलच असं समजून मी गेलें. तों ते माझ्यावरच अनुरक्त होऊन माझा हात धरायला धांवले. या त्यांच्या निर्भीडपणाचा मला राग येऊन मीं त्यांच्याकडे क्रोधयुक्त नजरेनं पाहिलं. तों ते भाजलों, जळालों असं म्हणून बेशुद्ध होऊन खालीं पडले. त्याची मला भीति वाटून मी तिथून पळून गेलें. पुढं शुद्धीवर आल्यावर त्यांच्या कृतीची त्यांना लाज वाटून ते दोघे निघून गेले असावेत.

**तुंबरू**—तें कांहीं असो; पण या एकंदर प्रकारावरून मला असं वाटतं, त्या जगच्चालकाच्या मनांतून तुझ्याकडून कांहीं तरी लोकोत्तर प्रकार घडवून आणायचा असावा.

**महानंदा**—तें काय असेल तें असो. तूर्त मी तर असत्य भाषण, मिथ्या स्तुति आणि खोटी कळकळ यांच्या जाळ्यांत गुरफटून गेलें आहें.

**तुंबरू**—अग, काळ्या कुट्ट कोळशाच्या खाणींतूनच तेजस्वी हिरकणी बाहेर येते.

**महानंदा**—आईचा उपदेश, बहिणीचीं आर्जवं, भावाच्या कुचेष्टा, इकडे दुर्लक्ष करून मी जी आशा धरून राहिलें आहें, ती केवळ तुझीं आश्वासनं व श्रीशंकराचे ठिकाणीं असलेली माझी निष्ठा. यांवर माझी खात्री आहे कीं, या दोहोंच्या जोरावर मी कोणत्याही संकटांतून पार पडेन. बरं चल, आजचं हें संकट टळल्याबद्दल आनंदानं भजन करीत देवाच्या दर्शनाला जाऊं.

**३६ पद**—( गिरिधर ब्रिजधर मुरली. )

**मणिधर फणिधर अमरधुनीधर। रजनीवर तरणी नयनीधर। वन्हिनिटिलधर जटिल व्यालधर ॥ धृ० ॥ जलधर दलधर हला-हालधर। प्रासपरिघधर व्याघ्रचर्मधर। भस्म पुंड्रधर रुंडमालधर॥ १ ॥**

---

*

## प्रवेश ५ वा

**स्थळ** — नंदीग्रामचें स्मशान

( नारदानें हातीं धरलेला इंद्र येतो. )

**इंद्र** — **३७ पद** — ( बिभास — त्रिवट — कस्कमरवा )

**वारवनिता ही विषसरिता । मायाममता हा तरि परिवर भोंवता ॥ धृ० ॥ अंध युवा जंव निघे फिराया ॥ सौख्य त्या दाविती वरिवरि या ॥ घालिति अवचित खालता ॥ १ ॥**

नारळ्या, आतां उगीच कालक्षेप करूं नकोस, मला एकदां लवकर नदींत ढकलून दे बघूं.

**नारद** — धनीसाहेब, आपल्याला प्राणच द्यायचा असेल तर नदीमध्येंच उडी घ्यायला नको. ही या नगराची स्मशानभूमि आहे. इथं प्राण सोडण्याचीं लागतील तितकीं साधनं आहेत व जीव देण्याला इथं कुणालाही सदर परवानगी आहे. हा समोर पर्वताचा कडा तुटला आहे, पाहिजे तर त्याच्यावर नेऊन तुम्हांला उभं करतों, खालीं डोकें वर पाय करून हळूच देह सोडून द्या, कीं तात्काळ कपाळमोक्ष. पाहिजे तर एक छानदारसा खडबडीत धोंडा आणून तुमच्यापुढं ठेवतों, त्याला मेंढ्यासारख्या धडका घ्या. तरीही मस्तकाच्या चिंधड्या होतील. पाहिजे तर आपलं मस्तक ऐरणीप्रमाणं त्याच्यावर ठेवा व मी वरून दुसऱ्या दग-डानं घणाप्रमाणं ठेचीत बसतों. पाहिजे तर पलंगाप्रमाणं एक छानदारशी चिता रचून तिच्यावर तुम्हांला निजवून पेटवून देतों. पाहिजे तर होमकुंडाप्रमाणं खड्डा खणून त्यांत तुम्हांला पुरून टाकतों किंवा तुमच्या गळ्याला दोरी बांधून त्या झाडाच्या फांदीला टांगतों, म्हणजे तीं वर बसलेलीं गिधाडं तुमच्या भाजून खुस खुशीत झालेल्या हाडामांसाचा तेव्हांच चट्टामट्टा करून टाकतील. तुम्हांला पसंत असेल तें सांगा. हा तुमचा आज्ञाधारक दास तसं करण्याला तयार आहे, धनीसाहेब.

**इंद्र** — नारळ्या, यापैकीं एकही मला पसंत नाहीं.

**नारद** — मग तुमची कोणती इच्छा असेल ती सांगा. त्याप्रमाणं तुमचे प्राण घ्यायला मी तयार आहे. श्रीमंत लोक गरिबांना इच्छाभोजन देतात.

माझ्यासारख्या गरिबानं आपल्यासारख्या श्रीमंतांना इच्छामरणावांचून दुसरं काय बरं द्यावं?

**इंद्र**—तर मग माझ्या गळ्यांत एक धोंडा बांधून मला नदींत ढकलून दे.

**नारद**—छे, छे, छे. पातकी लोकांचा प्राणवायु निघून जाईपर्यंत आपणांला कोणत्या कारणामुळं मरण येत आहे, याची त्यांना शुद्ध असावी तरच तें मरण. तसं नदींत उडी टाकून येणार नाहीं. तुमची शेंडी माझ्या हातांत द्या, म्हणजे नारळ फोडल्याप्रमाणं तुमचं मस्तक मी या शिळेवर हळूहळू आपटीत बसतों.

**इंद्र**—पंचभूतात्मक देहाचा त्याग करून दिव्य देह धारण करण्याला जलसमाधीपेक्षां उत्तम साधन नाहीं, म्हणून प्रत्येक अवतारी पुरुष अंतकाळीं याच साधनाचा अवलंब करतात.

**नारद**—एकूण आपण अवतारी आहांत म्हणायचे! पण काय हो, मृत्युलोकीं वेश्याजनाशीं विलास करून जगाला ज्ञानोपदेश करणारे असे आपण कोणते देव आहांत ते तरी समजूं द्या. माझ्या ऐकण्यांत अशा प्रकारचा एक देव आहे.

**इंद्र**—तो कोणता?

**नारद**— ३८ पद—(नम्र होती फलभारें.)

**स्वर्गलोकीं मुनिभार्या भोगोनियां॥ इंद्र झाला मुनि शापें भगेंद्र काया॥ धृ०॥ मृत्युलोकीं गणिकेनें कोपोनिया॥ दग्ध केली तव सुंदर ज्याची काया॥ कोण ऐसा स्वर्गातिल देवराया॥ १॥**

**इंद्र**—स्वर्गाचा राजा इंद्र तोच मी आहें.

**नारद**—खरं कीं काय? मग तुमचे डोळे काय झाले?

**इंद्र**—महानंदेच्या क्रोधनलानं दग्ध झाले.

**नारद**—एकदोन होतील. तुम्हांला हजार डोळे आहेत ना?

**इंद्र**—प्रथम दोन जळाले, त्याचा राग येऊन बाकीचे उघडले, तों त्यांच्याही खाची झाल्या.

**नारद**—हं हं! एकूण गाईच्या व्रणांत चोंच खुपसायला टपून बसलेल्या कावळ्याला जसा तिच्या शेपटीचा तडाखा बसला म्हणजे डोळे फुटून पंख फड-

फडून प्राण सोडण्याची पाळी येते तशी तुमची स्थिति झाली. बरं, तुम्ही स्वर्गाचें राज्य टाकून मृत्युलोकांत कां आलां होतां?

**इंद्र** — महानंदेचं सत्त्व हरण करण्याकरितां.

**नारद** — मग तसेच परत चाललांत?

**इंद्र** — माझ्यांतच कांहीं तत्त्व राहिलं नाहीं, तर तिचं सत्त्व कसं हरण करूं? मला वाटतं ती महानंदा लक्ष्मी, पार्वती किंवा सावित्री यांपैकीं कोणी तरी असावी.

**नारद** — अशी आपली खात्री झाली काय?

**इंद्र** — अगदीं पुरी खात्री. या तिघीवाचून या जगत्रयांत माझी अशी दशा करायला कोणीच समर्थ नाहीं.

**नारद** — तर मग —

३९ **पद** — ( त्यजि सखि पर्यंका. )

**चल विषय मदांधा ती महानंदा वंदाया॥ सुरतरु-सुमगंधा॥ धृ०॥ अंधांनीं संधान करावें इंदुकला वेधाया॥ तद्वत तव धंदा॥ १॥**

**इंद्र** — मला देवेंद्राला असं अरे तुरे करणारा तूं कोण रे? मी अंध असलों तरी एका शापोक्तीनें तुला दग्ध करीन, समजलास?

**नारद** — अंध झालास तरी अजून तुझा गर्व गेला नाहीं काय? थांब, तुला देवाधिदेव महादेव यांचेसमोर नेऊन असाच उभा करतों.

**इंद्र** — अरे, असा तूं आहेस तरी कोण?

**नारद** — ज्यानं तुला महानंदा कोण हें सांगितलं तोच मी आतां तुला महानंदेचा धनी कोण हें प्रत्यक्ष दाखवितों. ऐक, नीट कान देऊन ऐक. ( पडद्यांत शंख, डमरू, घंटा वाजतात. ) ऐकलंस? हें कोण आहे समजलास का?

४० **पद** — ( केदार–झंपा. )

**स्मर-दहन पुरहनन दर वाजवीत भं भं भं। हर्षांति शिवगण गर्जाति भं भं। भोला नटवद्विहरति नृत्य करिति रात्रंदिन॥ धृ०॥ सदय गिरिजानाथ॥ दिसतो आनंदांत॥ परि या क्षणार्धांत॥ कोपला पाहीन॥ कलह घडतां छान॥ मग तें समाधान॥ मघव्यासि अपमान॥ घडतांचि तोषेन॥ ३॥**

**इंद्र**—( भयभीत होऊन त्याचे पायांवर मस्तक ठेवून ) देवर्षे क्षमा करा, क्षमा करा. विषयमदानं धुंद झाल्यामुळं, मजकडून हा मोठा अपराध झाला. मी आपलं लेंकरूं आहें. मुनिवर्य, वादाला पेटवून आपणच मला स्फूर्ति दिली, तर आतां यांतून मुक्ति करणं आपल्याच हातीं आहे. ईश्वरांच्यासमोर आपण मला असा उभा कराल तर त्यांच्या कोपानलानं माझं हें शरीरच काय परंतु नांव देखील शिल्लक राहाणार नाहीं हो. तर मला क्षमा करा.

**नारद**—ठीक आहे, ऊठ आतां ; मी सांगतों असं कर.

**इंद्र**—सांगाल तें करतों ; पण मला ईश्वरांच्यासमोर नेऊं नका. त्यांचा राग फार कठीण आहे हो.

**नारद**—कांहीं हरकत नाहीं. तुला डोळ्यांनी दिसत नाहीं, तसंच कानानं ऐकूं येत नाहीं व तोंडानं बोलतां येत नाहीं, असा एक हाडामांसाचा पुतळा समजून उभा रहा. तुझं सर्व काम मी करतों. हे पहा, शिवगण दिसूं लागले.

( ट्रान्स्फर सीन–स्मशानाचा कैलास. )

( ईश्वर ध्यानस्थ बसले आहेत. सभोंवती नंदी, शृंगी, भृंगी, भद्र, भैरव वगैरे शिवगण ; योगिनी, शंखिनी, डंखिनी, कात्यायनी व यक्ष, राक्षस, झोटिंग, भुतं गात आहेत व नाचत आहेत असा प्रवेश उघडतो. )

**सर्व**— ४१ **पद**—( स्वस्थ बसावे. )

**बैलवाला सब दुनिया पालनवाला ॥ धृ० ॥ शिरपर जटाजूट लेडाला ॥ वामो छुपि बैठी एक बाला ॥ बिखसे कंठ भयो है काला ॥ शोभत गले रुंडकी माला ॥ १ ॥ आंखिया चांद सुरज उजियाला ॥ तीजा नयन अगनकी ज्वाला ॥ लंबा नाग गलोंमें डाला ॥ जोगिनी संग रहत अकेला ॥ २ ॥ आसन बनारसमो डाला । बूटेदार बघंबर पीला ॥ तापर गजचर्मांवर नीला ॥ डमरू हात लिये तिरसूला ॥ ३ ॥ बभुत बना लिया उजियाला ॥ गिरिजा माता अंग सुशीला ॥ बर देनेको बडा है भोला ॥ अमृत रायको वोहि बसीला ॥ ४ ॥**

**ईश्वर**—( समाधि विसर्जून ) कोण आहे रे, नंदी ?

**नंदी**—महाराज.

**ईश्वर** — मला समाधि लावल्याला किती काल झाला ?

**नंदी** — दीड तप, महाराज.

**ईश्वर** — मग मध्येंच माझ्या समाधीचा भंग कां केलांत ?

**नंदी** — देवाधिदेवा, आपण समाधिसुखांत निमग्न होतात, पण आपल्या या दासांना आपल्या सेवेवांचून काळ कंठवेना; म्हणून आम्हीं स्तुतीला प्रारंभ केला, त्यामुळं समाधिभंग झाला. तरी दीन बालकांवर कोप करूं नये, महाराज.

**ईश्वर** — ठीक आहे. समाधिविसर्जनानं आलेली खिन्नता तांडवनृत्यानं घालवून टाकूं.

**नंदी** — आज्ञा महाराज

४२ पद—( चला चला म्हसरं )

**अगड भं भं भं भं वाजे डमरू। नाचे सदाशिव जगतगुरु ॥ धृ० ॥ नाचे ब्रह्मा नाचे विष्णु नाचे महादेव ॥ जहां देखे पार्वति नाचे सब देव ॥ १ ॥ भांग खाय जहर खाय कालीया धतुर ॥ जोगीनीके पीछे लगे नंगे अवधूत ॥ २ ॥ काशी विश्वनाथ नाम जाके बीराजे ॥ आगे भैरव पीछे हनुमान जागे ॥ ३ ॥**

**नारद** — तात, हा दीन बालक चरणी लीन होत आहे. कृपादृष्टीनं अवलोकन कराव. ( नमस्कार घालतो ).

**ईश्वर** — कोण ? बाळा नारदा ! ऊठ ऊठ. ये, असा माझ्या शेजारीं आसनावर बैस

**नारद** — ( बसून ) तात, आज आपल्याला एक अशुभ वर्तमान कळवायचं आहे.

**ईश्वर** — तं कोणतं ?

**नारद** — जगन्माता पार्वती व गंगा मृत्युलोकीं वारांगना होऊन राहिल्या आहेत.

**ईश्वर** — अरे मग त्यात अशुभ काय ?

**नारद** — काय ? यात अशुभ कांहीच नाहीं ? तात, या जगत्रयांत असा एकदेखील पुरुष सापडायचा नाहीं की, ज्याला आपली भार्या वेश्या झाली हें ऐकून क्रोध येणार नाहीं. मला वाटलं होतं कीं, आपण याबद्दल मातोश्रींना

शासन करालच; पण असलं वर्तमान घेऊन येणाऱ्या मला काय करतां कुणाला ठाऊक? पण हा प्रकार कांहीं अद्वितीयच.

**ईश्वर**— **४३ पद**—(शामजी बोलोरे.)

**नारदा ऐके रे ॥ धृ० ॥ स्वर्धुनि गिरिजा राक्षससमया क्रोधांधा बनल्यावरि या ॥ रत झाल्या कलहांत बहु अविवेकें रे ॥ १ ॥ निष्कारण तो वाद परिसतां ॥ कोपाग्नी भडके पुरता ॥ शाप दिला व्हा वार-युवति निःशंकें रे ॥ २ ॥**

आणि तो शाप केवळ माझ्याच स्त्रियांना नव्हे तर या त्रैलोक्यांत ज्या स्त्रिया गृहकलहाला उद्युक्त होतील, त्या पुढील जन्मीं वेश्याच होतील. बरं. काय रे नारदा, माझ्या गिरजेच्या ठिकाणीं वारांगनेचे कोणते गुण कसे कसे आहेत रे?

**नारद**—मातोश्री इतक्या सुस्वर गायन करतात कीं, सर्व यक्ष, गंधर्व, किन्नर, अप्सरा निरनिराळीं स्वरूपं धारण करून तें ऐकण्याकरितां त्यांच्या प्रासादाभोंवतीं फिरत असतात.

**ईश्वर**—(आनंदानें) वाहवा! माझी पार्वती तशीच सुस्वर गायन करणारी आहे. बरं, ती नृत्य कशी करते रे?

**नारद**—तात, आपण तांडवनृत्याचे उत्पादक, पण मातोश्रींचं नृत्य पाहिलं म्हणजे त्यापुढं आपलं नृत्य म्हणजे "मोर नाचतो म्हणून लांडोर नाचते" ही म्हण बरोबर लागू पडते!

**ईश्वर**—काय रे, तूं आमच्या नृत्याची थट्टाच चालविलीस?

**नारद**—तसं नव्हे तात, वस्तुस्थिति निवेदन केली.

**ईश्वर**—बरं बरं, ती स्वरूपानं कशी दिसते सांग पाहूं.

**नारद**—मातोश्रींच्या स्वरूपाचं वर्णन मीं बालकानं, काय करावं तात? बाकी मातोश्री इतक्या सुस्वरूप दिसतात कीं, त्यांच्या स्वरूपावर लुब्ध होऊन त्यांची प्राप्ति करून घेण्याकरितां देवेंद्रदेखील वेषांतर करून गेला होता

**ईश्वर**—काय म्हणतोस? देवेंद्र माझ्या भार्येची प्राप्ति करून घेण्यासाठीं गेला होता? छेः, हें माझ्यानं मुळींच सहन करवत नाहीं. दक्षप्रजापतीनं माझ्या अपर्णेचा अपमान केला, म्हणून मी वीरभद्र उत्पन्न केला. तसा आतां दुसरा

वीरभद्र उत्पन्न करून त्या दुष्ट देवेंद्राचं शरीर छिन्नविच्छिन्न करून टाकवतों. नाहीं, इतकं देखील करीत बसण्याला मला अवकाश नाहीं. मी आपला तृतीय नेत्र उघडून या जगत्रयाचीच राखरांगोळी करून टाकतों.

४४ पद —( तदेरना देरना देरना. )

**त्रिलोचनाग्नि दशदिशांनिं। धडधडुनी पेटवोनी। इंद्र वरुण गुरु अरुण सह तरणी। देइन बघ आहुति जणुं हवनीं ॥ धृ० ॥ अखिल भुवन करिन दहन। जणुं तृण उदधि जलहि झणिं। कडकडुनी पंचभूतिं संचाराति प्राणि ॥ १ ॥**

**नारद** — तात, शांत व्हा. आपण समजतां इतका कांहीं देवेंद्रानं अविचार केला नाहीं.

**ईश्वर** — तर मग त्यानं किती अधमपणा केला तें सविस्तर सांग ; म्हणजे त्याला कोणती शिक्षा द्यायची तें ठरवूं.

**नारद** — त्यानं प्रथम मातोश्रींना अपार संपत्तीची आशा दाखविली.

**ईश्वर** — काय हें त्या मूढाचं अज्ञान ! अरे, ज्याचा द्रव्यनिधि सांभाळण्याकरतां कुबेर आहे, त्याच्याजवळ रत्नाला व सुवर्णाला कांहीं कमी आहे, असं समजण्याइतकी पार्वती कांहीं अज्ञान नाहीं ; परंतु द्रव्य हें प्रतिनरक म्हणून पार्वती त्याला मुळींच शिवत नाहीं. माशा जशा दुर्गंधींत पडून त्यांतच सुख मानतात त्याचप्रमाणं मूर्ख लोक कांचनासाठीं रात्रंदिवस धडपड करीत असतात. मोक्षाच्या प्राप्तीसाठीं रत्न व कांचन हें उपयोगी पडत नसून शंखादि मण्यांनींच मन निर्विकार रहातं म्हणून ज्ञानी पुरुषाच्या दृष्टीनं रुद्राक्ष व शंखमणी यांची किंमत हिरे, मोतीं, सुवर्ण यांपेक्षां फार मोठी आहे. अशा पवित्र अलंकारांना टाकून त्या रत्नकांचनरूपी नरकाच्या सामुग्रीची आशा माझी पार्वती कधींही करणार नाहीं.

**नारद** — देवेंद्राला असं वाटलं असावं कीं, मातोश्रींनीं आपल्यावर रागावून आपला त्याग केला आहे. तेव्हां —

**ईश्वर** — माझ्यावर रागावून ? असं मूर्खावांचून तर कोणी म्हणणार नाहीं. ती महासाध्वी माझ्यावर इतकं प्रेम करीत असे कीं, तिनं माझ्या अर्ध्या शरिरांत वास केला होता. पार्वती ही माया असून शंकर हे ब्रह्म आहेत, हें देवें-

द्रासच काय, परंतु जगत्रयाला ठाऊक आहे. तेव्हां माया ही ब्रह्मावर रागावेल, असं कधीं तरी होईल का? पार्वती ही श्रुति असून शंकर हे ओंकार आहेत. एखादे वेळीं सूर्य पश्चिमेला उदय पावेल, प्रकाश व छाया हीं दूर होतील, पण पार्वती शंकरावर कधींही रागावणार नाहीं.

**नारद**—संपत्तीकरतां नाहीं, मग काय संततीकरतां पार्वती मातोश्रींनीं–

**ईश्वर**—नारदा, तूं अगदींच अज्ञानी आहेस, तुझं म्हणणं साफ खोटं आहे. अरे, जी या विश्वाची जननी, सर्व प्राणिमात्र जिनं निर्माण केले, मनांत आल्याबरोबर मानसपुत्र निर्माण करण्याची शक्ति जिच्या अंगीं आहे, ती आदिमाया संततीकरतां आपला देहविक्रय करील असं मूर्ख व कपटी यांवांचून कोणीही म्हणणार नाहीं. बरं, त्या नीच देवेंद्रानं माझ्या गिरिजेचे काय काय अपराध केले ते तर अगोदर सांग.

**नारद**—आतां पहिल्यापासूनच सांगतों. मी एके दिवशीं इंद्राचे सभेंत गेलों व महानंदेच्या स्वरूपाचं वर्णन करूं लागलों.

**ईश्वर**—ही महानंदा कोण?

**नारद**—मृत्युलोकच्या नंदिग्रामांतील, विश्वमोहिनीनामक गणिकेची कन्या म्हणजे जगत्रयाची जननी म्हणजेच महादेवाची भवानी.

**ईश्वर**—(हंसून) अस्सं, अस्सं. माझ्या पार्वतीनं मृत्युलोकीं धारण केलेलं नांव महानंदा. किती मधुर नांव महानंदा! बरं पुढं.

**नारद**—मीं केलेलं वर्णन महेंद्राला सहन न होऊन तो महानंदेला वश करून घेऊन येतों अशी प्रतिज्ञा करून मृत्युलोकीं गेला.

**ईश्वर**—(त्वेषानं) अरे दुष्टा इंद्रा, थांब. बरं पुढं?

**नारद**—मग मीं व तुंबरूस्वामींनीं संगनमत करून मी देवेंद्राचा नोकर नारळ्या व तुंबरूस्वामी महानंदेची दासी तुंबा अशीं वेषांतरं करून गेलों.

**ईश्वर**—तें कशाकरतां?

**नारद**—मी महेंद्राचं कारस्थान मोडण्याकरितां व तुंबरूस्वामी महानंदेचं अज्ञान खोडण्याकरितां.

**ईश्वर**—(आनंदानं) ठीक—ठीक. पुढं?

**नारद**—तिथं जातों तों माझं बहुतेक काम महानंदेचा भाऊ ब्रह्मानंद यानंच केलं.

**ईश्वर**—तें काय ?

**नारद**—त्यानं महानंदेला दृष्टि पडूं न देतां तिच्याऐवजीं त्याची व सदानंदेची ओळख करून दिली.

**ईश्वर**—( आनंदानं ) भला फसवला ! पण ही सदानंदा कोण ?

**नारद**—महानंदेची वडील बहीण सदानंदा म्हणजे शंकराचे मस्तकावरील स्वर्धुनी गंगा.

**ईश्वर**—( हंसून ) अस्सं काय ? एकूण या सवती सवती एकाच घरीं बहिणी बहिणी होऊन राहिल्या आहेत काय ?

**नारद**—होय. पण आपण कोण आहोंत हें त्यांचं त्यांनाच ठाऊक नाहीं.

**ईश्वर**—कसं असेल ? मग माझा शाप तो काय ? बरं पुढं ?

**नारद**—पुढं सदानंदेनं देवेंद्राला रोज शयनाचे वेळीं तांबुलांतून भूल द्यावी आणि त्याचे अलंकार घ्यावे, असा क्रम चालू ठेवून दोनतीन दिवसांतच त्याला अगदीं अकिंचन केला.

**ईश्वर**—( आनंदानं ) अस्सं. छान केलंन. पुढं ?

**नारद**—तिसरे दिवशीं त्याला संशय आला. तेव्हां मीं सदानंदा ही महानंदा नव्हे असं स्पष्ट सांगितलं. तेव्हां त्यानं मला खऱ्या महानंदेला बोलावून आणण्यास पाठविलं. मी तिला घेऊन आलों. तेव्हां तिचं सौंदर्य पाहून मोहित होऊन देवेंद्र तिला धरण्याकरितां धांवला.

**ईश्वर**—( त्वेषानें ) अरे दुष्टा सुराधमा, थांब. बरं पुढं ?

**नारद**—पुढं महानंदेनं त्याच्याकडे क्रोधयुक्त नजरेनं पाहिलं मात्र, तों देवेंद्राचे सहस्रनेत्र दग्ध होऊन तो खालीं पडला.

**ईश्वर**—( आनंदानं ) छान, छान ; फार छान झालं. अपराधाप्रमाणं शिक्षा. देवेंद्राला मी शिक्षा करणार होतों ; पण माझं काम माझ्या प्रियेनंच केलं.

**नारद**—तर मग आपण आतां देवेंद्राला पुनः शिक्षा करणार नाहीं तर ?

**ईश्वर**—छेः, एकदां मृत झालेल्याला पुनः कोण मारतो ?

**नारद**—तर मग तात, तो पहा देवेंद्र आपली क्षमा मागण्यासाठीं आणला आहे.

**ईश्वर**—( त्वेषानें उठून ) माझ्या प्राणवल्लभेवर पापदृष्टि ठेवणारा नीच सुराधम तो हाच काय ?

४५ पद —( पियाके लचक बैठे. )

**हाचि का नीच खल मघवा। भुलुनि सुरविभवा भीन शिवप्रभवा। तक्षकमंदिरिं शिरला कां। नेणुनी अहिखंडनासि मंडुकसा॥ धृ०॥ स्वर्धुनिच्या सह शैलनंदिनी। भुवनिं होति जरि वारकामिनी। उभयतां पाहुनी वेषही नव घेउनी। जननि वराया जात मोहुनी। अंध पुत्र जैसा॥ १॥**

**इंद्र** —( पायांवर लोळण घेऊन ) हे षड्गुणैश्वर्यसंपन्न देवाधिदेवा महादेवा, मी अक्षम्य अपराध केल्यामुळें आदिशक्ति आदिमायेनं मला शिक्षा केली, हा जगज्जननीचा मजवर अनुग्रहच झाला. कारण मला ही शिक्षा केली नसती तर अधर्मानं वागल्याचं फळ अधोगति ही मला भोगावी लागली असती. विश्वेश्वरा, त्या शिक्षेनं माझ्या सर्व पातकांचा क्षय होऊन मला आपल्या चरणकमलांचं दर्शन झालं. देवा, ज्याप्रमाणं कोळी आपल्या इच्छेनं तंतु उत्पन्न करतो, त्याचं जाळं बनवतो, तें कांहीं वेळ रक्षण करतो आणि शेवटीं स्वतःच भक्षण करतो, त्याप्रमाणं या पातक्याची आपणच उत्पत्ति केली आहे, आजपर्यंत आपणच पालन केलं आणि त्याचा लयही आपणच करणार आहांत.

**नारद** — तात, हा देवेंद्र मातोश्रींच्या शिक्षेनं व कृतकर्माच्या पश्चात्तापानं शुद्ध झाला आहे; तरी त्याच्यावर कृपा करून त्याचा देह व नेत्र पुनीत करून त्याला त्याच्या स्थानीं पाठवून द्यावा, इतकीच या बालकाची सविनय प्रार्थना आहे.

**ईश्वर** — बरं तर; तुझ्या इच्छेप्रमाणं होऊं दे. देवेंद्रा, तूं वैकुंठनिवासी श्रीमहाविष्णूचा प्रतिनिधि, त्यांनीं तुझ्यावर संतुष्ट होऊन तुला स्वर्गाचें राज्य दिलें. तुझा अमल सर्व देवांवर चालूं लागला. तेव्हां मृत्युलोकची प्रजा म्हणजे काय पदार्थ आहे? त्यांच्यावर आपण वाटेल तसा जुलूम केला तरी ती आपलं काय करणार आहे, अशा घमेंडीनं तूं तेथील एका माणसावर बलात्कार करायला गेलास; त्याचा कसा परिणाम झाला तो पाहिलासच. तर आतां ध्यानांत ठेव, मृत्युलोकांत तुझ्या स्वर्गांतील देवांपेक्षांही कांहीं शक्तिमान लोक असतात, त्यांना अन्यायाच्या गांजणुकीनं खरा राग आला म्हणजे ते तुझ्यासारख्या महाविष्णूच्या प्रतिनिधीला देखील एका क्षणांत नामशेष करून टाकतील. मग तुझ्या इतर देवांची कथा काय? म्हणून आतांपासून ध्यानांत ठेव व मृत्यु-

लोकच्या माणसांच्या वाटेला कधीं जाऊं नकोस. अरे शृंगी, भृंगी, भद्र, भैरव, या देवेंद्राला चौघांनीं चोहोंकडून धरून त्या धर्मकुंडांत फेंकून द्या, म्हणजे त्याचा तो पंचभूतात्मक देह पंचत्व पावून तो आपला दिव्यदेह धारण करून स्वर्गलोकीं जाईल.

[ त्याला चौघेजण उचलतात. ]

**नारद**—( हळूंच ) पुरंदरशेट, अहो धनीसाहेब, तुम्हांला पाण्यांत जीव द्यायचा आहे ना? द्या आतां खुशाल.

**इंद्र**—देवर्षे, आमचे अजून कांहीं सोहाळे करावयाचे राहिले असतील तर करून घ्या. ( इंद्रास नेतात. )

**नारद**—तात, मघांशीं आपण म्हणालांत कीं, मातोश्रींना रत्नकांचनाचे अलंकार मुळींच आवडत नाहींत. तर तसं नाहीं. त्यांना तिथं द्रव्यावांचून दुसरं कांहींच दिसत नाहीं; जो पृथ्वीच्या मोलाचं कंकण देईल, तोच धनी करायचा व त्याच्याशीं पातिव्रत्यधर्मानं वागायचं असा; तर त्यांनीं पण लावला आहे.

**ईश्वर**—पृथ्वीच्या मोलाचं कंकण आणि पातिव्रत्यधर्मानं वागायचं? बरं, तें एखाद्या कुरूप, वृद्ध, तामसी, रोगिष्ट आणि दरिद्री अशा मनुष्यानं आणून दिलं तर?

**नारद**—अगदींच अशक्य. जो वारांगनेच्या प्राप्तीकरतां पृथ्वीच्या मोलाचं कंकण देणार, तो सुस्वरूप, तरुण, सशक्त, शांत व श्रीमंत असाच असणार.

**ईश्वर**—पण तसा नसून मी म्हणतों असा असला तर?

**नारद**—असणारच नाहीं. वृद्ध असला तर नायकिणीच्या दारांत जाईलच कशाला? आणि दरिद्री असला तर पृथ्वीच्या मोलाचं कंकण देईल कुठून?

**ईश्वर**—पण माझ्यासारख्यानं असलं रूप धारण करून तसलं कंकण दिलं तर?

**नारद**—दिलं तर? त्या आपल्याला पत्करणार आणि आपल्याशीं पातिव्रत्यधर्मानं वागणार.

**ईश्वर**—तर मग मी स्वतः जाऊन तसलं कंकण देतों आणि ती पातिव्रत्यानं कशी वागते तें पाहतों.

**नारद**—छे, छे. आपण या भानगडींत पडूं नये; हार खावी लागेल.

**ईश्वर**—(ईर्षेनें) तर मग मी जातोंच आणि तिला कसोटीला लावतोंच. चला रे गणहो.

**नारद**—हें लटांबर कशाला आणखी बरोबर? मातोश्रीच्या क्रोधानं आपलं कांहीं झालं तरी हरकत नाहीं. कारण शिवानं शक्तीला जिंकलं काय किंवा शक्तीनं शिवाला जिंकलं काय एकच. परंतु तक्षकांबरोबर हे गरीब दानवे जळून जायला नकोत. आतां आपल्याला कोणी सोबत पाहिजे असेल तर मी बरोबर येतों.

**ईश्वर**—कशाला? देवेंद्राचा सेवक झालास तेव्हां चांगलीं वस्त्रं व सुग्रास अन्न मिळत असेल; पण मीं अगदीं देवेंद्राच्या उलट वेषांतर करून जाणार आहे.

**नारद**—तरी चिंता नाहीं. आपण भिक्षा मागा, मी झोळी घेतों.

**ईश्वर**—पण ध्यानांत ठेव. माझ्या प्रियेनं भिल्लिणीचा वेष घेतला असतां माझी फसवणूक करण्याकरितां तूं जसं त्या वेळीं तिला साह्य केलंस, तसं या वेळीं मला करणार असशील तर चल. देवेंद्राप्रमाणं माझ्याच कामाचा बिघाड करण्याची तुझी मसलत असेल तर ध्यानांत ठेव, प्रसंग माझ्याशीं आहे.

**नारद**—छे-छे, तात! या बालकाविषयीं आपण मुळींच संशय धरूं नये.

**ईश्वर**—नंदी, शृंगी, भद्र, भैरव मणिमंतादिक गणहो, मृत्युलोकीं अपर्णेनं वारयोषितेचा जन्म घेऊन पातिव्रत्याचं खूळ माजवलं आहे. आम्ही तिचं सत्त्व हरण करण्यास जात आहों. तरी त्या प्रसंगीं मला तुमच्यापैकीं कुणाची जरूर लागेल याचा नेम नाहीं. तर तुम्ही सदासर्वदा सावध असा व मी ज्या वेळीं ज्याचं स्मरण करीन त्या वेळीं त्यानं तिथं प्रगट होऊन मी सांगेन ती कामगिरी बजवावी. जर यांत कोणी चूक करील तर तो माझ्या कोपानलाला बळीं पडेल.

**नंदी**—देवाधिदेवा, आपण मातोश्रींना घेऊन येईपर्यंत आम्ही असंच भजन करीत राहतों. पहा—

पद ४६—(साध निप धम.)

**शंभो शिवहरा अहिवरा भयकरा गरलधरा रुद्रा ॐकारा त्रिपुर हर हर हर ॥ धृ० ॥ अढळ अचल विमल नगसुता। तव सुकांता। ती तुजविशीं धरि अहंता। पतिवच प्रति पाळणार भारणार हारणार ॥ १ ॥**

## अंक २ रा समाप्त

---

# अंक ३ रा



## प्रवेश १ ला

**स्थळ** — विश्वमोहिनीचा महाल.

**विश्वमोहिनी** — बरं, तुझ्या म्हणण्याप्रमाणं पृथ्वीच्या मोलाचं कंकण देणारा एखादा भेटला; पण तो म्हातारा असला तर?

**ब्रह्मानंद** — तर काय? म्हातारा नवरा आजोबा आणि तरुण बायको त्याची नात, म्हणजे वरणभात.

**सदानंदा** — वरणभात म्हणजे रे काय दादा?

**ब्रह्मानंद** — म्हणजे कळीदार भात, त्यावर आंधळं वरण.

**विश्वमोहिनी** — गप्प बसा रे आतां. तिची कोणी थट्टा करूं नका. महानंदे, मी तुला अगदीं मनोभावानं विचारतें कीं, तुझ्यासारख्या लावण्यलतिकेला जर एखादा वठलेला पिंपळ भेटला तर?

**तुंबरू** — लतिकेला काय? वड, पिंपळ, ताड, माड, आम्र, फणस सर्व सारखे. ती कोणाच्याहीभोंवतीं विळखा घालून आपल्या कोमल पर्णांची छाया धरणारच.

**ब्रह्मानंद** — गप्प बैस. दोन मनुष्यं बोलत असलीं म्हणजे तिसऱ्यानं उगीच मध्यें चिचुंद्रीसारखं चू चू करूं नये.

**महानंदा** — कां बरं? गडे तुंबे, माझ्याबद्दल तूंच आईला उत्तर दे.

**विश्वमोहिनी** — म्हणजे? माझ्याशीं बोलण्याची देखील तुझी सोय उरली नाहीं एकूण?

**महानंदा** — तसं नव्हे, आई. मला कीं नाहीं त्याच त्याच गोष्टी पुनः पुनः बोलण्याचा कंटाळा येतो.

**विश्वमोहिनी** — हें पहा, तूं पण केला आहेस कीं, पृथ्वीच्या मोलाचं कंकण देईल तो पति करावा. पण समज, तें एका वृद्ध जरठ माणसानं दिलं तर तूं त्याला पत्करणार?

**महानंदा** — हो, हो. पत्करणार म्हणजे? वृद्ध माणसांनाच स्त्रियाच्या मदतीची जास्त आवश्यकता असते. त्यांना नीट चालवणार नाहीं, तेव्हां मी त्यांच्या हातांत धरण्याची काठी होईन. तरुणापेक्षां वृद्धालाच मी जास्त उपयोगी पडेन व माझं पतिव्रत्य त्यांच्याजवळच जास्त कसोटीला उतरेल.

**तुंबरू** — ( स्वगत ) ‘ राळयाचा भात पंक्तीला व म्हातारा नवरा गमतीला, ’ असं समजणाऱ्या बायकांनीं हें ध्यानांत ठेवण्यासारखं आहे.

**विश्वमोहिनी** — बरं, तो आंधळा असला तर?

**महानंदा** — तर मी देवी गांधारीप्रमाणं आपले डोळे बांधून घेईन किंवा त्यांच्या नेत्रांचं काम माझे नेत्र करतील.

**तुंबरू** — ( स्वगत ) नवऱ्याला झोंप लागली म्हणजे सूं बाल्या करणाऱ्या बायकांना हें सांगितलें पाहिजे.

**विश्वमोहिनी** — बरं, तो बहिरा असला तर?

**महानंदा** — भावी सुखदुःखाची सूचना मी त्यांना स्पर्शज्ञानानं देत जाईन.

**तुंबरू** — ( स्वगत ) बहिऱ्या नवऱ्याला तोंडांतल्या तोंडांत शिव्या देणाऱ्या बायकांनीं असं वागलं तर?

**विश्वमोहिनी** — बरं, तो रोगी असला तर?

**महानंदा** — मी वेळच्या वेळीं औषध व पथ्यपाणी करून त्यांना लवकर आराम वाटेल असं करीन.

**तुंबरू** — ( स्वगत ) आणि ज्या बायका नवऱ्याला औषधांतून विषप्रयोग करीत असतील त्यांचं काळीज कसं असेल बरं?

**विश्वमोहिनी** — आणि ज्याच्या अंगीं हे सर्वच दुर्गुण आहेत, असा एखादा दगड पदरांत पडला तर?

**महानंदा** — ती माझ्या आराध्यदेवतेची प्रतिमा समजून मी तिची अष्टौप्रहर मनोभावानें पूजा करीन.

**तुंबरू** — ( स्वगत ) उलट नवऱ्याला तंबी देणाऱ्या बायकांनीं हें ध्यानांत ठेवावं.

**विश्वमोहिनी** — बरं, तो फार तामसी आणि त्रास देणारा असला तर?

**महानंदा** — मी वारंवार क्षमा मागून त्यांचं प्रेम संपादण्याचा प्रयत्न करीन.

**तुंबरू**—( स्वगत ) पतीनं दिलेल्या गालिप्रदानांचा ज्यांच्या मुखांतून प्रतिध्वनि निघतो त्या स्त्रियांकरतां हें आहे.

**विश्वमोहिनी**–आणि तो सदानंदेच्या यजमानासारखा पळून गेला तर ?

**महानंदा**—मीही त्यांचा हात धरून पळून जाईन किंवा ते मला टाकून गेले तर महादेवाच्या देवळांत राहून राहिलेलं आयुष्य त्यांच्या मानसपूजेंत घालवीन.

**तुंबरू**—( स्वगत ) एक मेला दुसरा, दुसऱ्यानं आपल्याला सोडलं तिसरा, तिसऱ्याला आपण सोडलं चवथा, असं नवऱ्याचं रहाटगाडगं फिरवीत बसणाऱ्या अखंड सौभाग्यवतींनीं हें अवश्य ध्यानांत ठेवावं.

**विश्वमोहिनी**—त्या शंकरापुढं सहस्र महारुद्र केले, लक्ष नंदादीप लावले, कोटी ब्राह्मणसंतर्पणं केलीं, त्यानं ही असली मुलगी दिली. नशीब आपलं. त्याचा देवावर काय दोष ? महानंदे, वाग, तुला वाटेल तशी वाग. पण ध्यानांत ठेव, माझे हे शब्द तुला कधींतरी आठवण देतील. चला बाई.

( विश्वमोहिनी, सदानंदा व ब्रह्मानंद जातात. )

**महानंदा**—गडे, आपल्या सुखासमाधानाच्या गोष्टींत या कर्मकटकटीचीं विघ्नं येतात. हा माझ्या मागचा त्रास कधीं ग चुकेल ? ( दुंदुभिरव होतो. ) अगबाई ! हा आकाशांत दुंदुभिरव कशासाठीं बरं होत असावा ? हा कांहीं अनिष्टसूचक तर नसेल ?

**तुंबरू**—अग छे, दुंदुभिरव हा मंगलसूचक असतो. परमेश्वरानं कांहीं नवीन अवतार धारण केला तरीहि होतो. त्यांत तुला भिण्याचं कांहीं कारण नाहीं.

**४७ पद**—( गुरु गुरु रव )

**धडधड ध्वनि होत अंबरीं । दुंदुभीचा कावरि बावरी कां तरी ॥ धृ० ॥ समज सखे हा मंगलकारी ॥ होइल खचित तुला हितकारी ॥ आर्ये सद्गुणमंजिरी ॥ १ ॥ दक्षमखांतक तो त्रिपुरारी होइल संतत तव साह्यकारी ॥ निष्ठा ठेवि तयावरी ॥ २ ॥**

**महानंदा**—गडे, प्रत्येक प्रसंगीं तूं मला पुढच्या सुखाचीं नुसतीं आश्वासनं मात्र देतेस; पण त्याप्रमाणं कांहींच घडत नाहीं !

**तुंबरू**—अग, चांगलं घडून येण्याला कालावधि अधिक आणि तो जगन्नियंता भक्ति नीट कसाला लावल्याखेरीज कधींच कोणाचं चांगलं करीत नाहीं. ज्याची प्राप्ति व्हावी म्हणून तूं इतकी अधीर झाली आहेस तो तुला कसाला लावल्यावांचून कधींच राहणार नाहीं आणि त्यांतून पार पडलीस कीं खास समज—

**४८ पद**—( सुरज मुखना जायेरे )

**पतित जन पावन तो शिव शंकर तुज वरणार ॥ धृ० ॥ चातकिच्यास्तव स्वातिजलानें घन गर्जत गळणार ॥ १ ॥ पार्वतिपरिणय वर्णियलें जें सांप्रत ही घडणार ॥ २ ॥**

**महानंदा**—गडे, तुझ्या तोंडांत साखर पडो. ( पडद्यांत, 'जें जें मी मागूं तें मला वाढा.' ) गडे, बाहेर कुणी भिक्षेकरी आले आहेत, त्यांना काय हवं असेल तें नेऊन वाढ बरं.

( ईश्वर व नारद भिक्षेकऱ्यांच्या रूपानं प्रवेश करतात. )

**ईश्वर**— **४९ पद**—( नै जोबनवाली का )

**जें जें मी मागूं तें मला वाढा ॥ त्रयभुवनीं यश जोडा ॥ धृ० ॥ मातेच्या हातुनि तनय वधोनी । रांधा करोनी मला वाढा ॥ १ ॥ साध्वीनें सदनिं पाक करोनी । वसना त्यजोनी मला वाढा ॥ २ ॥**

**तुंबरू**—देवाधिदेवांनीं माझे शब्द लवकरच खरे केले म्हणायचे. ( नेत्र मिटून ) होय तेच. अग्नीची प्रखरता भस्माच्या आडूनदेखील जाणवते. तसंच विद्वत्तेचं तेज मलिन वस्त्रांनीं जरी झांकलं तरी स्पष्ट ओळखतां येतं. आणि ते दुसरे आमचे स्नेही नारदस्वामी. स्वारी इंद्राची वाट लावून देवांना घेऊन आली वाटतं ?

**महानंदा**—अग, त्यांना वाढायचं सोडून विचार करीत काय उभी राहिलीस ?

**तुंबरू**—ते काय मागताहेत तें ऐकलंस का ? अग, हे भिक्षेकरी इतरांपेक्षां फार चमत्कारिक दिसतात.

**महानंदा**—आपल्याला काय वाढायचं असेल तें वाढावं. अतिथीच्या वर्तनावर टीका करूं नये.

**तुंबरू**—तूला खोटं वाटत असेल तर तूंच विचार त्यांना काय पाहिजे

म्हणून. अरे ए भिक्षेकऱ्यांनो, तुम्हांला काय पाहिजे म्हणून आमच्या ताईसाहेब विचारताहेत. ( विश्वमोहिनी, ब्रह्मानंद व सदानंदा येतात. )

**विश्वमोहिनी** — कोण रे ते मेले धटिंगण, पोरीबाळींना काय मागतां रे ?

**तुंबरू** — अहो, आईसाहेब, ते म्हणतात आईच्या हातून मूल मारून तें शिजवून आम्हांला वाढा.

**विश्वमोहिनी** — होय का रे मेल्यांनो ? हें काय श्रियाळराजाचं घर आहे, म्हणून पोराचं मांस मागतां ?

**ब्रह्मानंद** — का खाटकाचं दुकान आहे ?

**सदानंदा** — का माणसं मारायचा कारखाना आहे ?

**नारद** — आपल्या घरीं येणाऱ्याच्या अंगाचीं सालन् सालं काढून त्याला आपल्या मुलाबाळांना मेल्याप्रमाणं तर करून सोडतां ; आणखीं माणसं मारायचा कारखाना तो कसला असतो ?

**तुंबरू** — आणखी आईसाहेब, ते म्हणतात, बायकांनीं स्वयंपाक करून, लुगडें सोडून ठेवून आम्हांला वाढलं पाहिजे.

**विश्वमोहिनी** — तुमचं डोंबल गेलं, मेल्यांनो ! आमच्या घरांत काय नागडीं भुतं नाचतात होय रे ? काय रे नासक्या, पोरीबाळींत असं अचकट विचकट बोलायला तुला कोणी आईबहिणी नाहींत का ?.

**ईश्वर** — नाहींत हो.

५० **पद** — ( देखो सखि )

**नाहीं मज या भुवनीं तातमाता कुणी ॥ धृ० ॥ दोन कामिनी जरी तनय तितुकेची तरी ॥ भीक मागत करीं फिरविती मेदिनी ॥ १ ॥ नाहीं शरिरीं वसन । नाहीं पदरींहि धन । नाहीं वसतिस्थान हिंडतो पितृवनीं ॥ २ ॥**

**ब्रह्मानंद** — अरे शहाण्या, तुझ्या बायकापोरांनीं तुला सोडलं, देवानं असं रोगिष्ट केलं, जवळ दांतावर मारायला पैसा नाहीं म्हणून भिक्षा मागत हिंडतोस ; तर लोकांनीं संतोषानं तुला वाढायला तोंडानं कांहीं गोड शब्द काढशील कीं नाहीं ? आमच्याजवळ माणसाचं मांस खायला मागतोस, तर आम्ही काय राक्षस ? कोण ? समजतोस तरी कोण आम्हांला ?

**ईश्वर** — मला काय ठाऊक तुम्ही कोण आहांत ते ?

**विश्वमोहिनी** — अरे, आम्ही वेश्या आहोंत. समजलास ?

**ईश्वर** — वेश्या आहांत ? तर मग छान झालं.

**५१ पद** — ( ए माजान मैका. )

**वेश्या देई ऐशी सुंदर जैशी सुरांगना। सुहास्यवदना शुचि रदना। नेत्र लाजवी मीना। दुर्लभ देवा दैत्यांना ॥ धृ० ॥ पाळुनि साध्विव्रतासि तीन दिन मम मनिषा पुरवावी। सीता तारा मंदोदरी ऋषिभार्या अनसूया तद्वत कुलभूषणा ॥ १ ॥**

**विश्वमोहिनी** — काय मेला वेडा आहे, कीं शहाणा आहे, हेंहि समजेना. म्हणे देवांगनेपेक्षां सुंदर वेश्या द्या. आतां या जरत्कारूला काय करायची वेश्या ?

**ब्रह्मानंद** — काय रे ए मूर्खशिरोमणे, तुझं डोकं फिरलंय वाटतं ? अरे वेड्या, आतां तुझं उतार वय झालं, व्याधीनं अंगाला रक्ताचे झरे फुटले आहेत, आज मृत्यु येईल कीं उद्यां येईल त्याचा नेम नाहीं ; आणि तुला रे कशाला वेश्या ?

**नारद** — कां बरं ? आमच्या धन्याच्या मनांतून वेश्येच्या उंबरठ्यांतच प्राण सोडायचे असले तर ? का अशीं उदाहरणं जगांत नाहींत ?

**ब्रह्मानंद** — हे कोण ? तुझे धनी होय ? तुला किती भाकरीचे तुकडे पगार देतात ?

**नारद** — पगार कांहीं मोजका ठरला नाहीं, मला खावबतील तितके तुकडे मी खातों आणि उरलेले तुमच्यासारख्यांच्यापुढं टाकून देतों.

**सदानंदा** — आणि आतां तुझ्या धन्याला देवांगनेप्रमाणं अमृत पिणारी वेश्या पाहिजे, तिचा निर्वाह त्या तुकड्यांवरच भागविणार वाटतं ?

**विश्वमोहिनी** — ही काय रे विनाकारण कटकट ? त्या दोघांना दे घराबाहेर हांकून.

**ईश्वर** — हांकून काय म्हणून ? मला महापतिव्रता विश्वयोपिता पाहिजे.

**विश्वमोहिनी** — विश्वयोपिता असून पतिव्रता असं म्हणणारी तुझ्यासारखी एक वेडी आमच्या घरांत आहे; पण तिला पृथ्वीच्या मोलाचं कंकण देणारा यजमान पाहिजे.

**ईश्वर** — त्यांत काय आहे? पृथ्वीच्या मोलाचीं कंकणं लागतील तितकीं मी देतों.

**ब्रह्मानंद** — तूं हीं हातापायाला गुंडाळलेलीं ना? तीं पृथ्वीच्या म्हणजे मातीच्या मोलाचीं आहेत खरीं.

**नारद** — अहो, पृथ्वीचं मोल जसं तिच्या गर्भातील द्रव्यांत, तसं त्याच्या मोलाचं कंकण या कंकणाच्या गर्भांत. पण त्या किमतीचा माल कुठं आहे तो तरी अगोदर दाखवाल कीं नाहीं?

**विश्वमोहिनी** — ( चेष्टेनें ) काय ग महानंदे, हें पृथ्वीच्या मोलाचं कंकण देणारे, आतां त्यांना पत्करून त्यांच्याशीं पतिव्रताधर्मानं वागतेस ना?

**महानंदा** — त्यांनीं कंकण दिलं तर पत्करीन आणि वागेनही.

**विश्वमोहिनी** — काय करूं ग, देव अजून डोळे उघडीना. कुणी तरी असाच अष्टावक्र येऊन तुझ्यासमोर उभा रहावा, मग पाहीन तुझं पातिव्रत्य.

**ब्रह्मानंद** — अहो चौपदरीबहाद्दर, तुम्हांला हवी तशी वेश्या ती पहा. तुमचा तुम्ही परस्पर व्यवहार ठरवा आणि काढा पृथ्वीच्या मोलाचं कंकण, म्हणजे आम्ही तुमच्या लग्नाची तयारी करतों.

**ईश्वर** — होय का ग गणिके? तूं माझ्याशीं पातिव्रत्यानं वागायला तयार आहेस? पहा, मी असा वृद्ध, कुरूप, रोगी आणि दरिद्री असून फार तामसी आहें. आधींच आपला नीट विचार कर.

**महानंदा** — आपण पृथ्वीच्या मोलाचं कंकण दिलं तर आपण याहीपेक्षां वृद्ध, याहीपेक्षां कुरूप, याहीपेक्षां रोगी, याहीपेक्षां दरिद्री आणि याहीपेक्षां तामसी असलांत तरी मी आपल्याशीं प्रेमानं विवाह करून शुद्धांतःकरणानं आपण म्हणतां त्याप्रमाणं तीनच दिवस काय, पण तीन जन्मदेखील वागायला कबूल आहें.

**ईश्वर** — या तुझ्या भाषणावर आम्हीं भरंवसा कसा ठेवावा?

**महानंदा** — कां बरं? माझ्या भाषणावर भरंवसा न ठेवण्यासारखं माझ्या हातून काय घडलं आहे?

**ईश्वर** — अग, तूं वेश्या आहेस.

**महानंदा** — महाराज, मी शरीरानं वेश्या आहें — मनानं नाहीं! कुलस्त्रिया व वेश्या दिसायला शरिरानं सारख्याच दिसतात; फरक काय तो अंतःकरणाचा

आहे, शरिराचा नाहीं. शरिरानं कुलांगना असून अंतःकरणानं नीच असेल तर ती कुलांगना कसली? तिला वारांगनेपेक्षांही नीच म्हटली पाहिजे, आणि शरिरानं वारांगना असून महान् अंतःकरणाची असेल तर तिला कुलांगना म्हणण्यास काय हरकत आहे?

**नारद**—अहाहा! महात्म्यावांचून असलं महान् अंतःकरण दुसरं कुठं सांपडणार व असल्या महान् अंतःकरणावांचून महान् इच्छाशक्ति कशी उत्पन्न होणार? आणि महान् इच्छाशक्तीवांचून महान् शक्तिमान परमेश्वराची इच्छा कोण वळवूं शकणार? ईश्वराला आळवून अवतार घ्यायला लावायला निव्वळ कोरडं वक्तृत्व अगर पोकळ पांडित्य मुळींच उपयोगी पडत नाहीं, तर अंतःकरण मोठं व्हावं लागतं आणि त्याला शुद्ध प्रेमभक्तीचा दुजोरा असावा लागतो. मृत्युलोकांतील कुलांगनांनो, आदिमायेनं गुंफलेला हा शब्दमौक्तिकहार आपल्या गळ्यांत घाला आणि वारांगनांनो, तो मिळविण्याविषयीं तुम्ही प्रयत्न करा.

**ईश्वर**—गणिके, तूं बोलतेस पुष्कळ; पण ध्यानांत ठेव, वेश्याजनांच्या भव्य प्रासादाला, शृंगारलेल्या रम्य मंदिराला, चंदनाच्या सुवासिक मंचकाला, मौल्यवान् वस्त्रालंकाराला व गौरवर्ण बाह्य स्वरूपाला भुलून, आपली संपत्ति फसून घालवून घरादाराला मुकणारा यजमान मी नव्हे.

**महानंदा**—मीही पण पूर्वार्जित संपत्तीवर डल्ला मारून, आपल्या गृहिणीच्या संसाराची माती करून, यौवनमदानं धुंद होऊन, आमच्या घरीं येणाऱ्या दरोडेखोरांना माझ्या पातिव्रत्याचा भांडारखाना लुटूं देऊन, इहपर-लोकाला मुकणारी वेश्या मी नव्हे.

**ईश्वर**—होय का? तर मग तिन्ही त्रिकाळ माझी सेवाचाकरी करून मला आनंदसागरांत बुडवील अशीच वेश्या मला पाहिजे.

**महानंदा**—मलाही पण माझ्याकडून तिन्ही त्रिकाळ सेवाचाकरी घेऊन, मला वेश्येची गृहिणीपदाला चढवतील असेच मालक पाहिजेत.

**ईश्वर**—तसा मालक मी आहें; पण पुढं माझा कंटाळा येऊन माझं कंकण तेवढं अपहार करून तूं आपल्या वचनापासून भ्रष्ट झालीस तर?

**महानंदा**—मी भ्रष्ट झालें तर ब्रह्महत्या, गोहत्या, मातृहत्या इत्यादि सर्व हत्यांचं पातक मला घडो, व त्याच्या क्षालनासाठीं यमधर्म मला कंटकवनांतून फरफर ओढीत नेवो, कडकडीत तेलाच्या कढईत टाकून तळो, तप्त लोहस्तंभाला

बांधून डागो. फार काय सांगूं, या त्रैलोक्यांत महापातक्यांना देण्याच्या ज्या भयंकर शिक्षा असतील त्या सर्व मला तो देवो.

**ईश्वर**—ठीक आहे. हें घे पृथ्वीच्या मोलाचं कंकण. त्याची किंमत करीव, आपल्या हातांत घाल आणि माझ्याशीं विवाह करायला तयार हो.

**विश्वमोहिनी**—अगबाई! पाहूं,

**महानंदा**— **५२ पद**—(हां रे दैया परू मैं)

**हां रे देवा! केला कां ऐसा कावा उगवीला माझा दावा ॥ धृ० ॥**

**ब्रह्मानंद—आतां देवा कां देसी दोष ऐसे ॥ होतां प्राप्तीफल ज्याचें कर्म जैसें ॥**

**तुंबरू—हा वर्मी बोले भ्राता ॥**

**नारद—परि लज्जा त्या भगवंता ॥**

**तुंबरू—म्हणुनि पहा ॥**

**नारद—शिव हर हा ॥**

**तुंबरू—येई गृहा ॥ १ ॥**

**महानंदा—अपमाना आतां ऐसा साहुं कशी मी रे ॥**

**नारद—काय भ्रम हा इज रे ॥**

**ब्रह्मानंद—मातातातांची रीती ॥ केव्हां सोडूं नये ती ॥**

**आली कां ही प्रचीती ॥**

**नारद—प्रचीती ऐसी नोहे ॥**

**तुंबरू—ही माया त्याची आहे ॥**

**नारद—स्वपतिसमान यातें मान ॥**

**तुंबरू—तरि अपमान जाई जाण ॥ २ ॥** (ब्रह्मानंद जातो.)

**विश्वमोहिनी**—अगबाई! सहज बोलायला गेलें तें खरंच झालं! महानंदे, तुझ्या पणाप्रमाणं पृथ्वीच्या मोलाचं कंकण देणारा मिळाला, आतां तुझं तें पातिव्रत्य कीं फितिव्रत्य आम्हांला दाखवायला तयार आहेस ना?

**महानंदा**—आहेसना म्हणून काय विचारतेस? एकदां सोडून दहादां आहें.

**विश्वमोहिनी**—पहा बरं! विचार कर!

**महानंदा** — अगदीं पुरता विचार केला आहे.

**विश्वमोहिनी** — हो. नाहींतर लग्नाचं सामान फुकट जाईल.

**महानंदा** — कांहीं नाहीं फुकट जात.

**विश्वमोहिनी** — तुला वेड तर नाहीं लागलं? अशा नासक्या हाडामासांच्या गोळ्याशीं लग्न लावून तूं काय करणार?

**महानंदा** — काय तें प्रत्यक्ष कृतीनंच करून दाखवणार.

**विश्वमोहिनी** — तर मग तुझा निश्चय नाहीं ढळत?

**महानंदा** — एकदां नाहीं, शंभरदां नाहीं, हजारदां नाहीं.

**नारद** — कायहो बाई, कंकण तुमच्या पदरांत टाकल्याबरोबर तुमची मुलगी आमच्या धन्याची झाली, आतां तिला तुम्ही फूस द्यायला पाहतां काय? चला. चट्दिशीं लग्नाची तयारी करा पाहूं.

**ब्रह्मानंद** — ( येऊन ) आई, हें पृथ्वीच्या मोलाचं आहे.

**विश्वमोहिनी** — ब्रह्मानंदा, सदानंदे, तुम्ही तरी तिला कांहीं सांगा.

**सदानंदा** — ताई, असं काय करावं बरं! लग्न करावयाचं तें आपल्याला सुख लागण्याकरतां ना?

**महानंदा** — होय. असा सर्वांचा ,हेतु असतो खरा; पण परमेश्वर प्रत्येकाला थोडंच सुख देतो?

**ब्रह्मानंद** — आपण जाणूनबुजून खाईंत उडी टाकली तर तिथं परमेश्वरानं काय करावं?

**सदानंदा** — म्हणून मी सांगतें, त्या कंकणाच्या आशेनं आपली सोन्यासारखी काया अशा रोगी माणसाला विकूं नको. पाहिजे तर त्याचं कंकण त्याला परत देऊन टाक.

**महानंदा** — मी देईन; पण त्यांनीं तें परत घेतलं पाहिजेना?

**ईश्वर** — मी घेतों, आण. त्याचप्रमाणं तूं आपले शब्द परत घे म्हणजे झालं.

**महानंदा** — मी ते फुकट बरे परत घेईन? माझा एकेक शब्द या कंकणापेक्षां हजार पटीनं अधिक मोलाचा आहे.

**ईश्वर** — मग तुझ्या सर्व शब्दांची काय किंमत असेल ती सांग. ती मी द्यायला तयार आहें.

**महानंदा**—तर मग आतां मला आपली धर्मपत्नी करून घ्या, म्हणजे माझ्या सर्व शब्दांची मला किंमत मिळाली असं मी समजेन.

**विश्वमोहिनी**—( निराशेनें ) अग खुळे पोरी, जाणूबुजून आपल्या सौंदर्याला अग्नि लावून कां घेतेस ?

**महानंदा**—छे-छे, हा अग्नि नव्हे; तर सर्व जगाची आहुति घेणाऱ्या तुम्हीं चालवलेल्या कामयज्ञावर पातिव्रत्यजलाचा वर्षाव करतें आहें.

**विश्वमोहिनी**—अग, हें जल नव्हे. हलाहल आहे, हलाहल. तें तुलाच काय, पण आम्हां सर्वांना गतप्राण करून टाकील.

**महानंदा**—छे, छे ; आई, हें हलाहल नव्हे बरं ; अमृत आहे. तें माझं, तुमचं व तुमच्यासारख्या कामानलानं दग्ध झालेल्या वेश्याभगिनींचं पुनरुज्जीवन करील.

**विश्वमोहिनी**—ब्रह्मानंदा, सदानंदे, चला बाई, लग्नाची तयारी करूं. लग्न कशाचं ? प्रेतसंस्कारच म्हणायचा. माझ्या पोरीचं नशीब फुटलं रे देवा ! ( जातात. )

**नारद**—धनीसाहेब, चला मी आतां तुम्हांला नवरदेवाचा पोशाख चढवितों. तुम्हांला बायको मिळाली ; मला आई झाली. ( जातात. )

**महानंदा**—( गहिंवरून ) गडे, तुझ्या आश्वासनाचा हाच का ग परिणाम व्हायचा होता ?

**तुंबरू**—सखे, ज्याचा भयंकर दुःखापासून आरंभ, त्याचा अतिशय सुखांत शेवट. तुझ्या कसोटीची तर हीच वेळ आहे. आतां आपल्या कडकडीत पातिव्रत्याचा प्रभाव या मृत्युलोकच्या वेश्यांना दाखीव व ज्याला तूं आपल्या चर्मचक्षूंनीं महाव्याधिग्रस्त, निर्बल, अकिंचन असा एक क्षुद्र मानवप्राणी अशा रूपानं पहातेस, त्याला अंतःचक्षूंनीं आपल्या आराध्यदेवतेच्या स्वरूपानं पहा, म्हणजे मी म्हणतें त्याची सत्यता पटेल.

**महानंदा**—बरं तर, तुझ्या मर्जीप्रमाणें मी त्यांना असं समजतें कीं—

**५२ पद**—( बिन बादल बिजली )

**गिरिजाधव सांब सदाशिव हा गिरिजाधव ॥ धृ० ॥ चंद्र सूर्य द्वय नेत्रिं विराजत । अनल कपाळीं त्रिलोचन हा ॥ १ ॥ व्याघ्र चर्म परिधान करी कधीं । फिरत स्मशानीं दिगंबर हा ॥ २ ॥ कालकूट विष कंठ दिसे परि । भक्तकामकल्पद्रुम हा ॥ ३ ॥** ( जातात. )

## प्रवेश २ रा

**स्थळ** — नंदीग्रामांतील रस्ता.

[ **पात्रें** — मशालजी, तबलजी, सारंगीवाला, हिरा, तारा येतात. ]

**मशालजी** — नवरामुलगा पन अक्शी दाना.

**तबलजी** — नुसता दाना न्हव, तर खासा नासका बेदाना.

**सारंगी** — नासका बेदाना तरी चवदार असतो. पन हा अगदींच कुच-कामाचा कुचका भुईमुगाचा दाना.

**हिरा** — कायग आई, इश्वमोहिणी इकती शाहानी शाहानी म्हनवते आनि आतां तिची अक्कल गेली कुठं ?

**तारा** — अग, पोरीणं जर ह्योच यजमाण करायचा म्हनन् हट्ट घेतला, तर तिणं तरी का करावं ?

**हिरा** — अहाहा ! उजेड त्या मुलीच्या शहानपनावर. नवरा जरा रोगिष्ट असला तर गरती बायकोनं देखील खुशाल दुसरा नवरा करावा, असं कांहीं ऋषि म्हनत्यात. ही महानंदा तर एश्या, अन् ही जानूनबुजून असला कुचका यजमान करते, तवा का म्हनावं ?

**मशालजी** — अहो हिराबाई, तुपासाठीं उष्टं खायचं — पृथ्वीच्या मोलाचं कंकन मिळालं, मजी ह्या बायका एखाद्या टोणग्याशीं देखील लग्न लावत्याल.

**तारा** — अरे, डोंबलाचं आलं आहे पृथ्वीच्या मोलाचं कंकन. माझ्या या हिरीच्या हातलावनीला पंचईस टिकल्या घेऊन मी नव्हती का पाचशांची गप्प उठवली ! तशातलंच हें कंकन.

**हिरा** — तसंच असेल. पन मला राहून राहून आश्चर्य वाटतं कीं, महानंदेला त्या सडघान यजमानाच्या मांडीवर बसन्याची आन् त्याच्या तोंडांतल्या इड्या तोडण्याची वकारी कशी आली नाहीं ! मला तर तें ओंगळवाणं ध्यान पाहूणच भडभडून आलं आनि त्याचं नांव काढलं कीं अजून बी येतं.

**तबलजी** — नवऱ्यामुलाला केशराच्या पान्यानं सानान घालीत होते. पन चौरंगाखालीं समदं लालभडक. तवा मला वाटलं कीं, एखादा बोकूडच कापत्यात का ?

**सारंगीवाला**—पुढं त्याच्या अंगावर भरजरीचे आहेर घालीत व काढीत, तवा मला अशी भीति वाटे कीं, या घालकाढींत एखाद्या शेल्याच्या टोकाला त्याच्या अंगांतला मासाचा लचका निघून येतो का!

**हिरा**—जें दुनियेंत कधीं दिसायचं नाहीं तें महाणंदेणं दावलं खरं. यंव रे यजमाण, महानंदेला घडवताणा बिरमदेवाला जितकी अक्कल खर्च करावी लागली, त्याच्या दसपट हा यजमाण बणवायला लागली असेल. मला तें जोडपं पाहूण असं वाटलं—

**५४ पद**—( जटरास तरुण हो. )

**जणुं मुक्ति मिळाली माकडा॥ ध्यान धारणा बोकडा ॥ धृ०॥ सुरभिला लाभला एडका॥ कोकिला वाहिली कीं बका॥ सारिका भेटली कौशिका॥ वधु गौर नीट फाकडा॥ वर तिचा इळयाहुनि वाकडा॥ १॥**

---

## प्रवेश ३ रा

**स्थळ**—महानंदेचा महाल

**ईश्वर**—( कण्हत ) अग महानंदे!

**महानंदा**—प्राणनाथांची काय आज्ञा आहे?

**ईश्वर**—मसणांत गेले तुझे प्राणनाथ.

**तुंबरू**—नारदस्वामी, अशा सुंदर श्रृंगारलेल्या मंदिरांत चंदनाच्या सुवासिक मंचकावर बसलं तरी देवांना अजून स्मशानाची आठवण होतेच आहे.

**नारद**—अहो, नेहमीं स्मशानांत बसण्याची संवय, तेव्हां रंगमहालांत चुकल्याचुकल्यासारखं वाटणं साहजिक आहे.

**ईश्वर**—अग चांडाळणी, तूं मला या पराच्या गादीवर बसविलं आहेस, तो मी खालीं दबलों आहें ना! माझा कोंडमारा करून मला ठार करण्याचा विचार दिसतो; बोलून चालून वेश्या तूं. चल, काढ तें माझं व्याघ्रांबर. खालीं अंथर आणि त्यावर मला बसव.

**महानंदा** — प्राणनाथ, त्या व्याघ्रांबराचे केस आपल्या देहाला पीडा देतील.

**ईश्वर** — ( त्रासून ) कांहीं नाहीं पीडा देत ; आणि दिली तरी तुझ्या पीडेपेक्षां कमी देतील. अंथर तें, जीभ हलवल्यावांचून एकदेखील काम करीत नाहींस आणि म्हणे पतिव्रता ! अंथर तें आणि त्यावर बसव. काय हा आडदांडपणा ! सावध रीतीनं माझ्या दंडाला धर. तुझे ते लोखंडाप्रमाणें हात माझ्या व्रणांतून रक्त काढतील.

**महानंदा** — नाहीं बरं प्राणनाथ. आपल्याला मुळींदेखील पीडा होणार नाहीं, अशा रीतीनं धरतें. ( त्यांना उठवून व्याघ्रांबरावर बसवते. )

**ईश्वर** — अरे राम, महानंदे, तुझं कल्याण असो.

**महानंदा** — श्रीसांबसदाशिवार्पणमस्तु !

**तुंबरू** — काय हो नारदस्वामी, देवांनीं मातोश्रींना दिलेला आशीर्वाद त्यांचा त्यांनाच परत आला ?

**नारद** — अहो, ही मातोश्रींनीं बरी युक्ति काढली. आतां एखादे वेळीं शिव्याशाप दिले तर त्यांचे त्यांनाच परत येतील.

**ईश्वर** — काय ग महानंदे, आम्हीं तुला दिलेला आशीर्वाद तूं सांबसदाशिवार्पण केलास ? म्हणजे तुला आमच्या आशीर्वादाची कांहींच किंमत नाहीं ?

**महानंदा** — तसं नव्हे महाराज, माझे सर्व देवधर्म, सुखदुःख, पापपुण्य, गतिअवगति यांचे स्वामी आपण आहांत, तेव्हां मला मिळालेला आशीर्वाद आपल्याला फलद्रूप व्हावा म्हणून सांबसदाशिव म्हणजे आपल्यालाच तो अर्पण केला.

**ईश्वर** — ( कण्हत ) अग आई ग, अरे राम !

**महानंदा** — महाराजांना आतां काय होतं आहे ?

**ईश्वर** — अग, माझी कंबर दुखते आहे.

**महानंदा** — मग अम्मळ रगडूं का शेगडी आणून शेकूं ?

**ईश्वर** — कांहीं नको शेगडी. हळूहळू रगड म्हणजे झालं. अरे राम !

**महानंदा** — प्राणनाथ, आतां काय होत आहे ?

**ईश्वर** — माझं डोकं दुखत आहे.

**महानंदा** — मग जरा सुंठ उगाळून लेप घालूं का ?

**ईश्वर** — हं घाल. अग अजागळे, सुंठ कशाला उगाळीत बसलीस ?

**महानंदा** — हिचा लेप आपल्या मस्तकावर घालतें.

**ईश्वर** —( त्रासून ) आतां माझ्या मस्तकावर दगड घाल. अग बहिरटे, माझं पोट दुखत आहे, डोकं नव्हे.

**महानंदा** — बरं, यांत तूपगूळ घालून कढवून चाटण करतें, तें घेतलं म्हणजे पोट राहील.

**ईश्वर** — म्हणजे तूं तींच तींच औषधं यांतलं त्यांत व त्यांतलं यांत करून मला पाजणार आणि त्यानं मला गुण येणार? तुला माझा कंटाळा आला आहे. मी आपला बाहेरच्या सज्जावर जाऊन पडतों कसा. ( जाऊं लागतो. )

**महानंदा** — नका हो नका. आपली प्रकृति अगोदरच क्षीण झाली आहे; आणि त्यांतून सज्जावरची गारठ्याची हवा लागून अधिकच बिघडेल. यासाठीं मी आपल्या पायां पडतें पण बाहेर जाऊन निजायचं करूं नये.

**ईश्वर** — तर मग ती सहाण, सुंठ, पाण्याचं भांडं फेंकून दे. माझं डोकं दुखत नाहीं किंवा पोट दुखत नाहीं. पाय दुखत आहेत, ते चेप. ( ती चेपते. ) अग, तूं पतिव्रता ना? मग आपल्या पतीसमोर मांडी ठोकून बसतेस? तुला कांहीं तरी भीड–मर्यादा? चल ऊठ, उभी राहून पाय चेप ( ती तसं करते. ) अरे राम! अग आई ग! पुरे झालं! किती वेळ पाय चेपायचे! माझी कंबर दुखते आहे म्हणून मघाशीं सांगितलं होतं तें इतक्यांत विसरलीस वाटतं? मला वाटतं, मी तुझा पति हें देखील तूं लवकरच विसरणार. तोंड काय पाहतेस? कंबर चेप. ( ती तसं करते ). अग आई ग, अग, पण मला भूक लागली आहे, त्याची काय वाट? का तूं अशीच साऱ्या रात्र माझी कंबरच दाबीत बसणार, म्हणजे त्यानं माझं पोट भरणार?

**महानंदा** — आपल्याला कांहीं फराळाचं आणून देऊं का?

**ईश्वर** — छे, भूक लागलेल्या माणसाला कुणी फराळाचं का आणून देतात? त्यांच्या पोटावर शेण थापतात. देवा! काय रे या वेड्यापिशींची व माझी गांठ घातलीस?

**महानंदा** — तसं नव्हे. फराळाला काय आणून देऊं म्हणून विचारलं?

**ईश्वर** — कां? तुझ्या घरांत कांहीं नाहीं? एवढं पृथ्वीच्या मोलाचं कंकण घेतलंस आणि फराळाचं काय देऊं म्हणून विचारतेस? तुमच्या गणिकांच्या कार्पण्याची कमाल असो. जा, मला तुझं कांहीं नको, मी आपल्या झोळींतली भाकरीच खाणार. का तीही तुम्हीं खाऊन टाकली? ( पाहून ) कुठं आहे?

एकदेखील तुकडा शिल्लक नाहीं. अग, तुम्ही बायका म्हणजे घर खाऊन वासे तोंडी लावायच्या! झालं, भुकेचं निमित्त निघालं कीं कंबर दाबायचं राहिलं. आतां काय तुला मारूं का चिरूं? अग, धांद्रटे, कंबर दाब, अरे राम! अग आईग!

**तुंबरू**—नारदस्वामी, तात असे कण्हतात कशानं?

**नारद**—अहो त्यांची कंबर खचली आहे.

**तुंबरू**—ती कशानं?

**नारद**—मातोश्रींच्या सत्त्वाच्या भारानं

(विश्वमोहिनी येते.)

**विश्वमोहिनी**—काय रे कारट्यांनो! तुम्ही अजून जागेच?

**नारद**—मग? काय करावं? हातरूण नाहीं पांघरूण नाहीं.

**विश्वमोहिनी**—बरं, माझी बाळ जागी आहे ना? अथवा तिला झोंप कुठून येणार? रडून रडून श्रमली असेल बिचारी.

**नारद**—त्यांना हो काय झालं रडायला? खुशाल इकडून तिकडं हिंडत आहेत. माझे धनी मात्र आयाईग ओयाईग, असं करून सारखे गुरासारखे ओरडत आहेत.

**विश्वमोहिनी**—त्याला देवानं रडवलं आहे, त्याला कुणीं काय करावं? मेला आम्हांला मात्र सर्वांना रडवायला आला आहे. (रडूं लागते.)

**नारद**—उगी, उगी, आईसाहेब. त्या पृथ्वीच्या मोलाच्या कंकणाकडे पाहून तरी रडूं आवरा.

**विश्वमोहिनी**—गप्प बैस मेल्या. (आंत जाऊन.) बाळे महानंदे, काय करते आहस? यजमानाची कंबर का दाबीत बसली आहेस? देवा रे देवा! तरुण अल्लड पोरींना ऐन तारुण्यसुखाच्या प्रारंभालाच अशा नवऱ्याच्या कंबरा दाबायचा, डोक्यावर सुंठी घालायचा, व्रणावर पट्ट्या बांधायचा दुर्दैवानं प्रसंग आला, तर त्यांनीं आपला सारा जन्म कसा काढावा बरं?

**नारद**—तुमची मुलगी काढते आहे तसा.

**विश्वमोहिनी**—कोण? माझी मुलगी? ती काढील पण मी बरी काढूं देईन? बाळे चल, आज आपल्या सर्वांना रंभेच्या घरीं गाण्याला जायचं आहे.

**महानंदा**—आई, मी जर बाहेर गेलें, तर माझ्या प्राणनाथांची सेवा कोण बरं करील ?

**विश्वमोहिनी**— तुझे प्राणनाथ ? अग हा प्राणनाथ नव्हे, प्राणघात आहे प्राणघात ! आणखी त्याची सेवा कसली ? आपण सेवा करण्याचा मक्ता का घेतला आहे ? नायकिणीच्याकडून सेवा घेण्याला तो पात्र असेल तर त्यानं खुशाल घ्यावी ; आम्ही तयार आहों.

**नारद**—आईसाहेब, तुम्ही उगीच तयारी कशाची करतां ? आमच्या धन्यांना तुमची सेवा नको आहे.

**ईश्वर**— महानंदे !

**महानंदा**— महाराज !

**ईश्वर**—तूं गायनकलेंत फार प्रवीण आहेस ; तर आपलीं सर्व आयुधं घेऊन मला उत्तमसं गायन करून दाखीव बघूं ! आणि या बाईला इथून घालवून दे. मला तिचा शब्द कर्णकठोर लागतो.

**महानंदा**—आई, अक्काला घेऊन तूं रंभेच्या घरीं जा. मी व तुंबा आज इथंच गात बसूं. प्राणनाथांना गाणं ऐकायचं आहे.

**विश्वमोहिनी**—मोठा मेला गाणं ऐकणाराचा सुडका !

**महानंदा**—हें पहा आई, तूं आतां त्यांना जे जे शब्द उच्चारशील ते ते मला बोलल्याप्रमाणं आहेत. तुला जर मी हवी असेन तर मी जसा त्यांना मान देत आहें तसा तूं द्यावास, हें मला बरं दिसतं.

**विश्वमोहिनी**— माझं खेटर अडलं आहे. आपल्याला कंकण मिळालं आहे. आतां त्या मेल्या जिवंत मढ्याची कशाची प्रतिष्ठा !

**महानंदा**—( रागानं ) कोण आहे रे बाहेर ? ( सेवक येतात. ) या मातृरूपी डाकिणीला एकदम कैद करा, तिच्या पायांत श्रृंखला ठोका ; आपल्या जामाताला अपशब्द उच्चारणाऱ्या तिच्या जिभेचे तुकडे करा आणि आपल्या कन्येला नरकाचा मार्ग दाखविणाऱ्या तिच्या हाताला डागण्या द्या. अन्नपाण्यावांचून तळघरांत कोंडून ठेवा तिला. ( सेवक तिला धरतात. )

**विश्वमोहिनी**—माझ्या घरांत, माझ्यावर सत्ता चालविणारी तूं कोण ?

**महानंदा**—न्यायशास्त्राप्रमाणं दत्तकविधान झाल्यापासून या घराची, संपत्तीची, नंदीग्रामाची, फार तर काय, या विश्वयोषितांच्या सर्व प्रांतांची

मी स्वामिनी आहें. वडील या नात्यानं आजपर्यंत मीं तुझा मान ठेवला व तुझ्या अनीतीच्या उपदेशाकडे दुर्लक्ष केलं, पण आतां तूं मला सक्तीनं नर्क-कुंडांत ढकलूं लागलीस, तर मला माझे अधिकार चालवलेच पाहिजेत.

**विश्वमोहिनी**—(त्वेषानं) तूं हे अधिकार कुणावर चालवीत आहेस? माझ्यावर? जिनं देवाला नवससायास करून तुला हें जग दाखविलं, खाऊंपिऊं घालून लहानाची मोठी केली, गायला-नाचायला शिकवून अज्ञानाची सज्ञान केली, त्या तुझ्या जन्मदात्या, अन्नदात्या, प्राणदात्या आईवर? चांगलं करतेस!

**महानंदा**—मुलांना सन्मार्गाचं शिक्षण देण्याकरितां परमेश्वर आईबापांची योजना करतो. ते जर त्यांना दुष्कर्म करण्याला शिकवूं लागले तर तसले आई-बाप मुलांपासून दूरच केले पाहिजेत. कुंपण हें शेताचं रक्षण करण्याकरतां घालतात, तेंच स्वतः जर शेत खाऊं लागलं, तर तसलं तें कुंपण जाळूनच टाकलं पाहिजे.

**विश्वमोहिनी**—(मऊ पडून) बरं बाई, मी तुझ्या कामांत आज-पासून मुळींच मन घालायची नाहीं; तुला वाटेल तशी तूं वाग. आतां तर झालं? हें पहा, तुझ्यापुढें हात जोडतें, पदर पसरतें, पाहिजे तर नाक घासतें.

**महानंदा**—अरे, तिला सोडून द्या. तुंबे, आण तो तंबोरा आणि तूंही मला म्हणूं लाग—

**५५ पद**—(आन बान जीया में)

**सांब सांब भज नरा रे मोक्षदायि रे ॥ वरदान बरें घेई त्वरें ॥ धृ० ॥ अचल प्रेम धरुनि खरें ॥ भजसि तरिच सार्थक रे ॥ नरतनु तुज लाभलि रे ॥ फिरुनि सकल फेरे ॥ १ ॥ ऋषि महंत श्रमति किति ॥ त्यजुनि सकल नाम जपति ॥ श्रुतिस्मृतिही वदती नेती ॥ समज उमज बा रे ॥ २ ॥**

**ईश्वर**—(त्रासानें) पुरे पुरे. असंच का तुला गातां येतं? पुरे कर तें गाणं. दे तो तंबोरा ठेवून. त्या पोरीला दे हांकून बाहेर. तिचं गाणं तर मला अगदींच नीरस वाटलं आणि त्यायोगानं माझं मस्तक मात्र अधिक दुखूं लागलं.

(तुंबरू तंबोरा घेऊन बाहेर जातो.)

**नारद**— या तुम्ही देवलोकचे गंधर्व. शेवटीं मृत्युलोकीं पशूच ठरलांत!

**तुंबरू**—लक्ष्मीपतीपुढं गायचं सोडून पशुपतीपुढं गायलों म्हणून.

**ईश्वर**—महानंदे, तुझ्या अंगीं एकदेखील असा गुण नाहीं कीं, ज्यानं मला घटकाभर तरी समाधान होईल. व्यर्थ मीं आपलं बहुमोलाचं कंकण घालवून असली कुचकामाची बायको करून घेतली!

**महानंदा**—महाराज, आपली ही दीन दासी अगदीं अजाण आहे, तरी हिच्यावर दया करून आपल्याला समाधान वाटेल अशा गोष्टी करायला शिकवा, म्हणजे त्याप्रमाणं मी करीन.

**ईश्वर**—तर बायकांना शिकवायची मी शाळाच घालतों. बरं चल. हें व्याघ्रांबर तुझ्या पलंगावर अंथर म्हणजे त्यावर मला सुखानं निद्रा येईल. (ती तसं करते.) (ईश्वर त्यावर झोंपेचं सोंग घेऊन पडतात. महानंदेस पाय चेपतां चेपतां झोंप लागते.) (ईश्वर उठून पाहून) अहाहा! माझे लाडके गिरिजे! काय तुझं कंठमाधुर्य कीं, ज्याला कोकिलांनीं सुद्धां लाजावं. काय तुझं गायनकुशलत्व कीं, ज्याला गंधर्व-अप्सरांनींदेखील माना डोलवाव्या. देवी दाक्षायणी, तूं कोणत्याही वेषांत आणि कोणत्याही व्यवसायांत असलीस तरी माझ्या ठिकाणीं असलेलं तुझं हें निस्सीम प्रेम पाहून मला किती आनंद होतो आहे म्हणून सांगूं! तो माझा मलाच व्यक्त करतां येत नाहीं.

**नारद**—तातमहाराज, आतां मातोश्रींचा किती अंत पाहायचा?

**ईश्वर**—हिच्या सत्त्वहरणमात्रेचा अजून एक वळसा द्यायचा आहे.

**नारद**—तात, आजपर्यंत त्या मात्रेचे बरेच वळसे देत आलांत; पण कांहींच परिणाम झाला नाहीं. आपली मात्रा मात्र झिजून गेली.

**ईश्वर**—बेट्या, तुझा ओढा माझ्यापेक्षां गिरिजेकडे जास्त दिसतो; म्हणून मला यश येत नाहीं. तर तूं इथून जा कसा.

**तुंबरू**—नारदस्वामी, तातांच्या मर्जीप्रमाणंच होऊं द्या. चला आपण.

**ईश्वर**—नारदा, तुंबरू तो हाच का रे! तुंबरू, तूं फार निरुपद्रवी आहेस, असं मी आजपर्यंत ऐकत होतों; आणि आतां पहातों तो तूं या नारदापेक्षांही लटपट्या दिसतोस!

**तुंबरू**—कशाचं तात? हा नारदस्वामींच्या शिक्षणाचा परिणाम. (जातात.)

**ईश्वर**—अपर्णे, मी तुझ्याशीं कपटाचरण करीत आहें, त्याची तूं मला क्षमा कर. माझ्या कापट्यानं तुला कांहीं काल कष्ट होतील, पण त्यांतून तूं निभावशील

तर माझ्या कृपेचें अधिष्ठान होऊन जगांतील वारांगनांना सन्मार्गदर्शक होशील. मी जें करणार आहें, तें मत्सरानं नसून केवळ प्रेमांतःकरणानं करीत आहें, याची साक्ष पतीनं पत्नोला द्यायची म्हणजे त्यानं तिच्या कपोलरूपी सुवर्ण-पत्रावर, आपल्या दंतशलाकांनीं अनुरागरसांत पंचमहाभूतांच्या साक्षीनं असं लिहून ठेवायचं ( चुंबन घेतात, महानंदा एकदम भयानं जागी होते ).

**महानंदा**—धांवा हो धांवा ! हा मेला—

**ईश्वर**—काय झालं, महानंदे ! अग, मीं तुझं चुंबन घेतलं. त्याची तुला किळस आली ? का घाण वाटली ?

**महानंदा**—नाहीं बरं प्राणनाथ. आपण माझं चुंबन घेतलं त्यानं माझा देह पावन झाला. तसंच आपण या वेश्या नांवानं दूषित झालेल्या सर्वांगाला आलिंगून रहाल तर मी कृतकृत्य होऊन आनंदसागरांत गुंग होऊन राहीन. माझ्या मनांतून या दोन्ही देहांतील आपपरभावना नाहींशा होऊन मी आपल्या देहाशीं ऐक्यता पावेन. आपल्याला या रोगानं होणाऱ्या वेदनांची मी अर्धी भागीदारीण होईन आणि माझ्या मनांतील आशा अर्ध्याअधिक सफल झाल्या असं मी समजेन.

**ईश्वर**—मग मीं चुंबन घेतलं तेव्हां तूं भ्यालीस आणि ओरडलीस तें काय म्हणून ?

**महानंदा**—त्या वेळीं मी स्वप्नमय स्थितींत होतें आणि मला—

**५६ पद**—( बिभास–त्रिवट )

**भास जाहला काल व्याल हालत डुलत लपत छपत येउनियां मज डसला ॥ ध्रु० ॥ भ्रांत चित्त झालें जागीं तो भ्रम गेला प्रियकर रद मुखास झगडतसा दिसला ॥ १ ॥**

**ईश्वर**—यावरून आतां तुला झोंप येत आहे आणि मलाही येत आहे ; तर हें घे. हें माझं प्राणलिंग आहे. हें शयनकाळीं जवळ ठेवायचं नसतं. यासाठीं त्याला अशा ठिकाणीं ठेव कीं, त्याला विटाळ होणार नाहीं, कोणी चोरून नेणार नाहीं, किंवा कोणत्याही कारणानं नष्ट होणार नाहीं.

**महानंदा**—ठीक आहे, मी हें आपल्या नर्तनशाळेंत ठेवतें. तिथं रात्रीं कुणी येत नाहीं. ( घेऊन जाते. )

**ईश्वर**—( स्वगत ) नंदी, भृंगी आदिकरून माझे प्रियगणहो, ही प्राणलिंग ठेवून परत येतांच तुम्ही अदृश्य रूपानं येऊन इच्या नर्तनशाळेला अग्नि लावा.

( झोंपेचं सोंग घेऊन पडतात. )

**महानंदा**—( येऊन पाहून ) अग बाई, इतक्यांत झोंपदेखील लागली. देवाधिदेवा, महादेवा, तूं एवढं कालकूट विष प्राशन करून जगत्रयाचा दाह शांत केलास त्या तुला, आपल्या एका कृपाकटाक्षानं, माझ्या प्राणेश्वराच्या शरीराचा या दुष्ट रोगानं उडवलेला दाह शमन करवणार नाहीं का? तुला दीन भक्तजनांचा रक्षक म्हणतात. मग तूं या तुझ्या दीनदुबळ्या दासीविषयीं इतका निष्ठुर कशानं झालास? प्रभो, आतां माझा फार अंत पाहूं नकोस. ( झोंप घेण्याकरतां पडते, तोंच नर्तनशाळेंतून अग्नीच्या ज्वाळा निघूं लागतात. विश्वमोहिनी सदानंदा, ब्रह्मानंद, नारद व तुंबरू रडत ओरडत प्रवेश करतात. )

**विश्वमोहिनी**—अग, महानंदे, ऊठ ऊठ. आपली नर्तनशाळा जळाली. ऊठ ऊठ, निजलीस काय? अहो जांवई, उठा उठा, आग लागली.

**महानंदा**—( पाहून ) अगबाई, घात झाला हो घात झाला. प्राणनाथांचं दिव्य लिंग नर्तनशाळेंत जळालं.

**ईश्वर**—( उठून, क्रोधानं ) अग चांडाळणी!

**५७ पद**—( मालकंस–त्रिवट )

**दिव्य लिंग त्वां जाळिलें ॥ पतिला स्वयें वधिलें कुटिले ॥ धृ० ॥ वारयोषा साध्विवेषा घेति ऐशा कांतनाशा ॥ द्रव्यार्जनासाठींच ना ॥ साध्वीपणा चाले ॥ १ ॥ नर्कप्राप्ती होय अंतीं जाणचितीं ये प्रचीती ॥ प्राणार्पणा वेळीं कुणा साध्वीपणा चाले ॥ २ ॥**

**महानंदा**—( कनवाळूपणानें ) नाहीं हो महाराज, मीं मुळींच कपट केलं नाहीं. आपल्या चरणाची शपथ ( पायावर मस्तक ठेवते. )

**ईश्वर**—( लाथेनं झिटकारून ) प्राणाची पर्वा न करितां जिनं प्राणलिंग जाळून माझे प्राण घालविण्याचा प्रसंग आणला, ती माझ्या पायाची काय किंमत समजणार?

**महानंदा**—महाराज, नका हो असं बोलूं. क्रोधानं संतप्त झाल्यामुळं आपल्या देहाला अधिक यातना होत असतील, हें माझ्यानं सहन होत नाहीं.

**ईश्वर** — तर मग ज्यानं माझं प्राणलिंग दग्ध केलं, त्या अग्निनारायणाला हा देह समर्पण करून तुझं मन शांत करतों. ( जाऊं लागतात. ती मिठी मारते. )

**महानंदा** — नका हो नका. आपल्या जिवाला कांहीं बरंवाईट करून घेऊं नका.

**ईश्वर** — चांडाळणी, पतिप्राणघातिनी, आतां माझ्या शरिराला स्पर्श करूं नकोस. मला तुझा विटाळ होतो. सोड मला, नाहीं तर प्रथम तुझा प्राण घेईन, नंतर माझा देईन.

**महानंदा** — ( अधिक बिलगून ) तर मग मी आपल्याला कधीं सोडणार नाहीं. आपल्या पतीच्या हातून मला मृत्यु येत आहे अशी अमृतसंधि मी कधीं वायां जाऊं द्यायची नाहीं. घ्या, प्राणनाथ, माझे अगोदर प्राण घ्या. माझी अमंगल काया आपल्या देहाबरोबर येण्याला योग्य नसेल तर माझे प्राण तरी आपल्या हातीं घेऊन जा. महाराज, या पापी कायेला आपल्या देहाचा फारच अल्पकाळ सहवास घडला; पण माझ्या प्राणांनीं आपला काय अपराध केला आहे ? त्यांना तरी आपल्या चिरकाल सान्निध्याला असूं द्या. एवढं तरी मला दान द्या हो.

**ईश्वर** — अरे, तुम्ही सर्व जण पाहतां काय ? मी खरोखरीच या धडधड पेटणाऱ्या अग्नीमध्यें माझ्या पंचप्राणांची आहुति देणार आहें, तर हिला माझ्या-पासून दूर न्या. ही लावण्याची खाण, तुमचा सर्वांचा पंचप्राण, विनाकारण या रोगिष्ट दरिद्र्याबरोबर अग्नीमध्यें दग्ध होऊन जाईल. तर हिला माझ्यापासून सोडवा व घेऊन जा. ( हिसकाहिसक करतात, महानंदा घट्ट मिठी मारते. )

**ईश्वर** — ( त्रासून ) महानंदे, मला सोडतेस कीं नाहीं ?

**महानंदा** — नाहीं महाराज !

**ईश्वर** — तूं पतिव्रता म्हणवतेस ना ?

**महानंदा** — होय, महाराज.

**ईश्वर** — मग तुझ्या पतीची इच्छा प्राणत्याग करण्याची असतां तूं त्याला अडथळा कशी आणतेस ?

**महानंदा** — हा अडथळा नव्हे, प्राणत्यागाला मी उलट साह्यच करतें आहें.

**ईश्वर** — मग तुझ्यासारख्या पतिव्रतेचे मीं प्राण घ्यावे, यांत मला पाप नाहीं का ?

**महानंदा**—पतिव्रतेनं आपल्या पतीला स्वतांच्या दृष्टीसमोर आत्महत्या करूं द्यावी यांत मला पाप नाहीं का ?

**ईश्वर**—तर मग असं कर. मला सोड. मी अग्नीमध्यें उडी टाकतों. मग तुला पतिव्रताच म्हणून घ्यायचं असेल तर तूं माझ्यामागून सती ये.

**महानंदा**—आपण प्राणत्याग करणं नि नंतर मीं सती जाणं या दोहोंच्या मुळाशीं आपल्याला प्राणत्याग न करूं देणं हें आहे. तें साधेल तोंपर्यंत करतें आणि माझ्या दुर्दैवानं न साधेल तर आनंदानं सती जाईनच.

**ईश्वर**—तर मग कशाचं साधन करतेस तें कर. शंभो, हरहर महादेव !

( ईश्वर जातात. )

**महानंदा**—अहो धांवा हो, कुणी त्यांना धरा. हाय रे देवा ! त्यांनीं अग्नींत उडी घेतली, सोडा मला. मला त्यांच्या मागोमाग जाऊं द्या. मी तुमच्या पायां पडतें. मला आतां कुणी अडवूं नका. तो पहा, माझ्या प्राणनाथांनीं आपला रोगग्रस्त देह अग्नींत दग्ध करून दिव्य देह धारण केला आणि कैलासाचा मार्ग धरला ; आणि मीं ? अशीच ? अशीच राहणार ? छे ? नाहीं. असं कालत्रयीं होणार नाहीं. ते पहा ! मला कैलासाला नेण्याकरतां थांबले आहेत. सोडा मला. माझी आतां तुम्हां सर्वांना हात जोडून विनंति आहे कीं, माझी प्राणनाथांच्याबरोबर सहगमनाची तयारी करा.

**विश्वमोहिनी**—[ डोळे भरून येऊन ] ब्रह्मानंदा, जा बाबा. हिच्या सर्व मैत्रिणींना बोलावून आण आणि हिची सती जाण्याची सामुग्री आणीव. [ तो जातो. ] बाळे, जातेस तर जा. आजपर्यंत माझं काय ऐकलंस तें आतां हेंच ऐकणार आहेस ! पण जातांना आपल्या बहिणीचा, भावाचा व तुझ्या जिवाच्या मैत्रिणींचा निरोप घे. मग इतक्यांचा लोभ सोडून तुला जावंसं वाटलं तर जा. [ रंभा, मेनका, वगैरे नायकिणी येतात. महानंदेस पुष्पमाला वगैरे घालतात व भेटतात. ]

**तुंबरू**—नारदस्वामी, आतां या सदानंदेची जराशी गंमत करूं का ?

**नारद**—करा, करा, मी तेंच सांगणार होतों. जाऊं द्या दोघींही बरोबरच.

**तुंबरू**—अक्कासाहेब, त्या पहा ताईसाहेब, आपला निरोप घ्यायला येत आहेत. त्यांची आपण बोळवण करायची नाहीं तर दुसरं कोण करील बरं? उगी, रडूं नका, डोळे पुसा आणि त्यांच्याकडे पहा ( तिच्या डोळ्यांवरून हात फिरवतो ). ( नारद व तुंबरू जातात. )

**सदानंदा**—( एकदम चपापून ) अहाहा! देवर्षे, आपण मला वेळेवर दिव्यदृष्टि देऊन सावध केल्याबद्दल मी आपली फार ऋणी आहें. ताई, तूं एकटी सती जातेस, थांब, मीही तुझ्याबरोबर येतें. बाबांनो, ताईबरोबर माझी देखील पाठवण करा.

( सर्व बायका महानंदेस व सदानंदेस मळवट भरून पुष्पहार घालतात. त्या रंगशिळेवर उभ्या राहतात. )

**महानंदा**—बायांनो, तुम्हांला उपदेशाचे शब्द सांगावे, असा कांहीं माझा अधिकार नाहीं; तरी पण पतिनिधनानंतर सती जाण्यासाठीं रंगशिळेवर उभ्या राहिलेल्या बालिकेस वृद्ध स्त्रियांनादेखील कांहीं उपदेशात्मक शब्द सांगण्याचा अधिकार येतो, म्हणून मी आपल्या गणिकामैत्रिणींना इतकंच सांगतें कीं, कुलस्त्रिया जसा आपला पति हें दैवत मानतात, तसा आपण आपला गांधर्वविवाहाचा पति आपलं दैवत मानलं पाहिजे. कुलस्त्रियांचं सर्व आयुष्य जसं एका पतीवर अवलंबून जाणं शक्य असतं तसं आपलंही जाण्याला कांहीं अशक्य नाहीं, उलट धार्मिक रीत्या पातिव्रत्यानं वागून गायननर्तनादि गुणांनीं आपली व्यावहारिक स्थिति सुधारण्यास कुलस्त्रियांपेक्षां गणिकांना फार सवड आहे. मधुपान करण्यासाठीं कमलिनीभोंवतीं एकच भ्रमर गुंजी घालीत राहील तर ती दीर्घकाल टवटवीत व विशेष शोभायमान दिसते; तेच तिच्यावर जर अनेक भ्रमर झडप घालतील, तर ती अल्पावकाशांतच कोमेजून तिला भ्रमराचीच काळिमा येईल. तशीच आपली वेश्यांची स्थिति होते हें ध्यानांत आणून, आपलं पातिव्रत्य अनेक श्वानांसाठीं ठेवलेल्या भाकरीप्रमाणं चव्हाट्यावर न ठेवतां कृपणांच्या संपत्तीप्रमाणं जपून ठेवाल तरच तुमच्या देहाचा, तुमच्या कुलाचा व तुमच्या देशाचा उद्धार होईल, हा माझा तुम्हांला पूर्ण आशीर्वाद आहे. आतां मी जातें. मी आजपर्यंत जाणतेपणीं अगर अजाणतेपणीं तुमचा कांहीं उपमर्द केला असेल, तर त्याची मला क्षमा करा—

**५८ पद** — ( आरंभीं आळवूं तूंतें. )

**निरोप मज द्या क्षणीं ॥ साजणी ॥ आनंदयुत वदनीं ॥ धृ० ॥ ऋणी ठेविली करुनी ॥ साजणी ॥ अनंत उपकृतिंनीं ॥ कैलासपद रोखुनी साजणी ॥ जातें मी आजि येथुनी ॥ सार्थकीं देह लागला ॥ साजणी ॥ सच्चिदानंद भेटला ॥ १ ॥**

( महानंदा व सदानंदा अग्नींत प्रवेश करितात. )

**सव** — **५९ पद** — ( दत्ता दिगंबरा ये रे. )

**शंभो सदाशिवा येई ॥ इजला तुझ्या पायिं नेई ॥ धृ० ॥ जाळिली जणूं मदनमूर्ती ॥ म्हणुनी प्रार्थित तुजसि रती ॥ काळिजें आमुचीं चरचरती ॥ परि इची तनुही न थरथरती ॥ खरी खरी साध्वी इस पाही ॥ इजला तुझ्या पायीं नेई ॥ १ ॥**

**भजन**

**स्वजन शुभंकर शिव हर शंकर भं भं भं बोला ॥**

( विमानांत शंकर, पार्वती व गंगा दिसूं लागतात. नारद व तुंबरू प्रगट होतात. )

**ईश्वर** — बाळा नारदा, बाळा तुंबरू, माझ्या शापानं वेश्या झालेल्या या गिरिजा व गंगा तुमच्या दोघांच्या महत्प्रयासानं माझ्या स्वरूपीं येऊन मिळाल्या, याचा मला फार संतोष झाला. तसा तुम्हांला आनंद होण्याला मीं तुमचं काय बरं प्रिय करावं ?

**नारद** — तात, उभयतां मातुश्रींनीं आपल्या चरणधूलीनं ज्या नंदीग्रामाला पावन केलं, ज्या वेश्याकुलाला वेश्याश्रमींचा धडा घालून दिला, त्या सर्वांचा उद्धार व्हावा व कलियुगांत ज्या वेश्या अशा वागतील त्यांचाहि असाच उद्धार होईल असा आपला त्रिवर्गांचा आशीर्वाद असावा.

**ईश्वर, पार्वती, गंगा** — तथास्तु – तथास्तु – तथास्तु

**नारद, तुंबरू** — देवा, आपलं भक्तवात्सल्य काय वर्णन करावं ?

## नारदस्तुति

६० पद —(भैरवी - त्रिवट)

श्रुति-स्मृति तुजप्रति मानिती, जरि वानिती, परि नेणती, शोधिति त्रिजगतिं, परि भ्रमति, श्रमविती तनु किती, वदती अंतीं नेतीति ॥ ध्रु० ॥ जगतीं महंत याति तव प्राप्तीकारितां किती शिणविती तनु हविती, कितिहि ती जळिं बुडविती। किति दडती प्राणायामांतीं, वधिती पशुप्रति किति ॥ १ ॥

समाप्त

